

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष १३ वें ] डिसेंबर १९५९ [ अंक ३



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.

अनुक्रमणिका








प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचें मासिक

# नवभारत

वर्ष तेरावें
अंक तिसरा

डिसेंबर
१९५९

संपादक-मंडळ

आचार्य स. ज. भागवत–श्री. हरि कृष्ण मोहनी–प्रा. वि. म. बेडेकर

प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेंकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
'गणेश भुवन' २७६, तेलंग रोड, माटुंगा–मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( ज. सातारा )











अनुक्रमणिका

# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | | |
|---|---|---|
| (१) धर्मकोश– व्यवहारकाण्ड | भाग १ ते ३ | किंमत |
| साधी बांधणी ... | ... ... | ५२–०–० |
| कापडी बांधणी ... | ... ... | ६४–०–० |
| (२) धर्मकोश– उपनिषत्काण्ड | भाग १ ते ४ | |
| साधी बांधणी ... | ... ... | ११०–०–० |
| कापडी बांधणी ... | ... ... | १२६–०–० |
| (३) धर्मकोश– संस्कारकाण्ड | भाग १ ला | ४५–०–० |
| (४) मीमांसादर्शन ... | ... ... ... | ३०–०–० |
| (५) मीमांसाकोश ... | भाग १ ते ४ | १३५–०–० |
| (६) कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश | ... ... | ६–०–० |
| (७) हिंदुधर्माची समीक्षा ( लक्ष्मणशास्त्री जोशी ) | ... | ५–०–० |
| (८) वैदिक संस्कृतीचा विकास ... | .. ... | ६–०–० |
| (९) नवमानवतावाद ... | ... ... ... | २–८–० |
| (१०) मानवाचा आदर्श ... | ... ... ... | ३–०–० |
| (११) चार्वाक– इतिहास आणि तत्त्वज्ञान ( प्रा. सदाशिव आठवले ) | ... ... | ३–०–० |
| (१२) गीता-प्रवेश ( डॉ. गो. वि. देवस्थळी ) | ... | २–८–० |

अनुक्रमणिका

# सार-संकलन

## जागतिक राजकारणाचा हिमालयप्रदेश

चीनच्या आक्रमणामुळें हिमालयाला जागतिक राजकारणांत महत्त्वाचें स्थान प्राप्त झालें आहे. भारत-चीन संबंधांत सोविएटचें धोरण 'समाधानकारक' असल्याची ग्वाही दिल्लीहून दिली जात आहे. तथापि या समजुतीच्या मुळाशीं देखील कांहीं गैरसमज असणें शक्य आहे. हिमालयांतील राजकारणावर प्रकाश टाकणारा श्री. फील्ड यांचा एक लेख ता. २८ सप्टेंबरच्या "न्यू लीडर" मध्यें प्रसिद्ध झाला आहे. "नवभारता"च्या वाचकांसाठीं याचा येथें थोडक्यांत गोषवारा देत आहोत :

"हिमालयांत उदयास आलेला एक नवा राजकीय घटक नेपाळ हा होय. भारताव्यतिरिक्त इतर अनेक राष्ट्रांशीं आतां नेपाळचे राजकीय संबंध प्रस्थापित झाले आहेत. संयुक्त अरब प्रजासत्ताक, सिलोन, फ्रान्स, स्वित्सर्लंड, जपान, कम्युनिस्ट चीन, अमेरिका, ब्रिटन, सोविएट रशिया या सर्वांनीं नेपाळला मान्यता दिली आहे. आजवर ब्रिटन व भारत वगळल्यास इतरांचे राजकीय संबंध अप्रत्यक्षरीत्या दिल्लीद्वारा ठेवले जात. हा संकेत मोडणारें पहिलें राष्ट्र म्हणजे सोविएट रशिया! भारतीय परराष्ट्रीय खात्याचा सल्ला न घेतां १९५९ च्या एप्रिलमध्यें सोविएटनें नेपाळशीं करार केला. या करारान्वयें नेपाळला सुमारें दीड कोटी रुपयाची देणगी, एक विद्युत् उत्पादनाचा कारखाना, एक साखर कारखाना, एक सिगारेट कारखाना व एक हॉस्पिटल, इतकें साहाय्य देण्याचें सोविएटनें मान्य केलें असून मोबदला म्हणून खाटमांडु येथें वकिलात उघडण्याची परवानगी मिळविली आहे. नेपाळचें परराष्ट्रीय धोरण आतां दिवसेंदिवस दिल्लीऐवजीं खाटमांडूंतच निश्चित होणार हें स्पष्ट दिसत आहे. अशा प्रकारचा प्रत्यक्ष राजकीय संबंध, तिबेट पादाक्रांत केल्यानंतर, चीनला हवा होता; पण त्यावेळच्या नाजुक परिस्थितींत हा प्रश्न काढणें चीनला फारसें इष्ट वाटलें नाहीं. सोविएटनें हें एकापरीनें चीनचेंच कार्य केलें असें म्हणतां येईल.

नेपाळ व कांहीं अंशीं सिकीम वगळल्यास भारताच्या या ईशान्य सरहद्दीवरील लोकसंख्येविषयीं कांहींच कल्पना नाहीं. सिकीम व पश्चिम भूतानमधील बहुसंख्य प्रजा नेपाळीच आहे. आसाममधील चहाच्या मळ्यांतील बहुसंख्य कामगार त्यांच्यांतीलच आहेत; आणि मॅक्मोहन सरहद्दीचें रक्षण करण्यासाठीं वापरल्या जाणाऱ्या भारतीय सैन्यांतहि त्यांचा भरणा आहे. ब्रह्मदेशांतील काचीन प्रदेशाच्या वायव्य सरहद्दींपर्यंत त्यांच्या वसाहती आढळतात. खुद्द नेपाळची लोकसंख्या १९५५ सालीं प्रसिद्ध झालेल्या खानेसुमारीवरून ८४ लक्ष इतकी आहे. व ती दरवर्षीं अडीच टक्क्यांनीं वाढत आहे. सिकीमची लोकसंख्या १७५००० इतकी असून त्यांत १३७००० नेपाळी आहेत. भूतानच्या सुमारें ६००,००० प्रजेपैकी बहुतेकांची भाषा नेपाळीच आहे. किंबहुना या सर्वच प्रदेशाची मुख्य भाषा नेपाळीच म्हणतां येईल. खुद्द तिबेटमध्यें १०००० हून अधिक नेपाळी आहेत. आणि भारतीय सरकार व व्यापारी यांच्या संबंधीं त्यांच्या मनांत कांहींशी अढीच आहे. आणि ती परंपरागत आहे. भारतविरोधी भावनांचा उद्रेक या प्रदेशांत प्रत्ययास आलेला नाही हें खरें. परंतु त्याचें कारण कम्युनिस्ट चीनची भीति हें होय. नेपाळ, सिकीम वा भूतान याजवरील आक्रमण हें भारतावरील आक्र-







मणच समजलें जाईल अशी घोषणा नेहरूंनीं वेळोवेळीं केली आहे. या प्रदेशांतील लोकांच्या सहकार्यावांचून भारतीय सैन्याला या प्रदेशांत कोणतीहि महत्त्वाची हालचाल करणें कठिणच होईल.

नेपाळमधील सोविएट धोरण काय राहाणार ? येथील कम्युनिस्ट पक्षाला उत्तेजन देऊन प्रस्थापित राज्य उलथून टाकण्याची धडपड करण्याची त्यांना गरज नाहीं. नेपाळी राष्ट्रवादाला उत्तेजन दिल्यानें, "विशाल नेपाळ" आंदोलनाला पाठिंबा दिल्यानें, त्यांचा कार्यभाग सहज साधूं शकेल. सुमारें दीडशें वर्षें सतत वाढणारी नेपाळी प्रजा येथील डोंगराळ प्रदेशांत अडकून पडली आहे. जमीन अपुरी म्हणून अनेकांना पैशासाठीं परकीयांची नोकरी करावी लागते. म्हणून विशाल नेपाळची घोषणा सर्वांना एकत्र आणूं शकते व दक्षिणेकडील भारतांतील भूमीची लागवड आपण एकेकाळीं करीत होतों याचें त्यांना स्मरणहि आहे. सोविएट नेत्यांना या वस्तुस्थितीची जाणीव असावीसें दिसतें.

मुख्यत्वें भारतापासून व शक्यतर पाश्चात्यांच्या संपर्कापासून येथील प्रजेला दूर ओढणें हा या प्रदेशांतील चिनी-रुसी धोरणाचा मुख्य हेतु आहे. १९५८ सालीं सोविएट वकील नेपाळमध्यें असतांना चीननें "सभोंतालच्या राष्ट्रांशीं विचार विनिमय करून या प्रदेशांतील भारत व चीन यांची सरहद्द नक्की केली पाहिजे" असा भारताला खलिता धाडला होता; व ही सरहद्द स्पष्ट असल्यानें असें करण्याचें प्रयोजन नाहीं" असें भारतानें ता. २ डिसेंबर १९५८ रोजीं उत्तरहि दिलें होतें हें प्रसिद्ध आहे. १९५९ च्या मार्चमधें तिबेट पादाक्रांत केल्यानंतर चीननें या सरहद्दीवर विशेष दडपण आणलें. त्यांचें पहिलें आक्रमण नेपाळ, भूतान वा सिकीम या प्रदेशांवर नव्हतें; तें भारतीय प्रदेशावर होतें. हिमालयांतील या राज्यांच्या नेत्यांना या घटनेचा अर्थ समजला असलाच पाहिजे. "आपणांवर हल्ला झाल्यास युद्धाची भाषा बोलणारा भारत स्वतःच्या प्रदेशाचें रक्षण करण्यासाठीं देखील युद्ध करूं इच्छित नाहीं" ही घटना त्यांना अर्थपूर्ण वाटणें स्वाभाविक आहे. तथापि भारतानें केवळ कम्युनिस्ट चीनबद्दलच सावध राहिलें पाहिजे हें म्हणणें पुरेसें नाहीं. नेपाळी राष्ट्रवादाला पूर्णतया भारतविरोधी वळण देण्याचें सोविएट धोरणहि त्यानें ध्यानांत घेतलें पाहिजे.

'डोनाल्ड वाइज्' या डेली एक्स्प्रेसच्या वार्ताहरानें १९५८ च्या डिसेंबरच्या खलित्यांत असें वृत्त दिलें कीं, "तिबेटमध्यें सोविएट रॉकेटतज्ञांच्या देखरेखीखालीं सुमारें अडीच लक्ष चिनी सैनिक स्वतंत्र राष्ट्राच्या रोखानें अत्यंत भयावह स्वरूपाच्या दूरगामी अस्त्रांची प्रक्षेपनभूमि तयार करीत आहेत." तिबेटमधील बंडाचा या बातमीशीं संबंध असणें शक्य आहे. "गुरुत्वाकर्षणाचें वैशिष्ट्य व हिमालयांतील हवाई वहातुकीच्या अडचणी यामुळें अशा तऱ्हेची भूमि बव्हंशीं सुरक्षित राहाण्याचा संभव आहे. पृथ्वीचें स्वतःभोंवतीच्या भ्रमणाची दिशा ध्यानांत घेतल्यास पश्चिमेकडील लक्ष्यांचें अंतर अशा अस्त्रांच्या दृष्टीनें कमी होणार. अशा रीतीनें चीन व रशिया यांच्या सहकार्यानें निर्माण होणारी ही भूमि पश्चिम युरोप, उत्तर आफ्रिका, पश्चिम आशिया, पश्चिम पॅसिफिक महासागर व सर्व चीन या भूप्रदेशावर वर्चस्व गाजविण्यास उपयुक्त ठरेल." सिकीम, भूतान, लडाख या हिमालयांतील राज्यांचें एकादें संयुक्त राज्य निर्माण करण्याची चीनची योजना आहे काय ? असा भारतीय लोकसभेच्या कांहीं सभासदांनीं १३ ऑगस्ट १९५९ रोजीं नेहरूंना प्रश्न विचारला होता. आणि दलाई लामानें आपल्या एका निवेदनांत तिबेटमधें आतां तिबेटी प्रजेपेक्षां चिनी लोक अधिक असल्याचें जाहीर केलें आहे. सर्व हिमालयावर कबजा मिळविला कीं वर उल्लेख केलेली प्रक्षेपनभूमि विरोधी नागरी प्रजे-








पासून सुरक्षित होईल व दक्षिणेकडून तेथें येण्याचे सर्व मार्ग रोखून धरतां येतील असा चीनचा कयास आहे. व हें कार्य सोविएट सहकार्यावाचून चीनला करतां यावयाचें नाहीं हें उघड आहे. हा धोका सर्वांनीच ध्यानांत घेतला पाहिजे.

तटस्थतेचें धोरण कायम राखूं इच्छिणारे व पश्चिमेशीं संरक्षक करार करावयाचा नाहीं असा निश्चय केलेले नेहरू अशा प्रकारें एका विलक्षण शृंगापत्तींत सांपडले आहेत. चीन–सोविएट धोरणाचा अंशत: सामना करणें त्यांना शक्य आहे. सिकीमसह सर्व नेपाळी भाषा बोलणारांचा प्रदेश नेपाळच्या आधिपत्याखालीं ठेवण्यास ते संमति देऊं शकतात. तसें केल्यास भारत व चीन यांच्यामध्यें एक प्रबळ, मोठें राज्य निर्माण होईल. आणि द्वेष-भावनेनें पछाडलेल्या अंकिताऐवजीं एक प्रभावी मित्र भारतास मिळूं शकेल. मात्र असें करतांना चीननें तिबेटमधून मागें हटलें पाहिजे अशी अट त्यांनीं घालावी. असें झाल्यास चीनच्या सूचनेनुसार विशाल नेपाळ, भूतान व तिबेट यांचें संयुक्त राज्य निर्माण होणें शक्य होईल. आणि त्याची तटस्थता पूर्णपणें कायम राखण्याची हमी सर्वांना देतां येईल. उलट चीननें ही योजना अमान्य केल्यास या प्रदेशांतील वाढत्या राष्ट्रवादाचा सर्व रोख चीनविरुद्ध वळवतां येऊं शकेल.

## चीनच्या विशाल झेपेचा बोजवारा

गेल्या वर्षी कम्युनिस्ट चीन आर्थिकक्षेत्रांत अत्यंत ' मोठी झेप ' टाकून पुढें जाणार याविषयीं भरपूर अधिकृत प्रचार होत होता. तथापि या प्रचाराबरोबरच कांहीं अडचणीहि हळूं हळूं प्रकाशांत येत होत्या. वहातुकींच्या साधनांवर असाच बोजा पडत आहे. पोलादाच्या कारखान्यांचें उत्पादन हळूंहळूं निकृष्ठप्रतीचें होत आहे. शेतीविषयक बदल असंतोष निर्माण करीत आहे. अशा बातम्या येत होत्या. असें असूनहि यावर्षी उत्पादनाचा इष्टांक अतिशय वरच्या पातळीवर ठेवण्यांत आला. बहुतेक मोठमोठ्या उद्योगधंद्यांत ४० ते ८० टक्के उत्पादनवाढ करण्याचा निर्णय घेतला गेला. तथापि अडचणींचें निराकरण न झाल्यानें हे इष्टांक गांठले जाणार नाहींत. ही भीति बळावत गेली, आणि अखेरीस जुलैच्या सुमारास " रेड फ्लॅग " या कम्युनिस्ट पार्टीच्या मुखपत्रानें उत्पादनाचे इष्टांक ठरवितांना अधिक वास्तव दृष्टिकोण स्वीकारला पाहिजे अशी घोषणा केली. त्याबरोबरच कांहीं भागांत महापूर तर इतरत्र ठिकाणीं दुष्काळ अशीं नैसर्गिक अरिष्टें आल्यानें शेतीचें पीकहि पुष्कळ कमी झालें. आणि या सर्वांचा परिणाम म्हणून कम्युनिस्ट पक्षाच्या मध्यवर्ती समितीनें उत्पादनाचे इष्टांक बरेचसे खालीं आणणारा ठराव पास केला. अन्नधान्याच्या वाढीची अपेक्षा जवळजवळ निम्म्यानें कमी करण्यांत आली. पोलादाचें अपेक्षित उत्पादन १८० लक्ष टनांवरून १२० लक्ष टनांवर आणण्यांत आलें. असाच बदल इतरहि कांहीं बाबतींत झाला. यांतील विशेष मौजेची गोष्ट ही कीं गतवर्षी जी उत्पादन पातळी गांठली म्हणून म्हणण्यांत येत होतें त्याहून या वर्षीचे कांहीं आंकडे पुष्कळच खालची पातळी सूचित करीत आहेत. तथापि असें असूनहि ' विशाल झेप ' टाकण्याचें उद्दिष्ट पुन्हां उद्घोषित केलें गेलें, आणि तद्विषयक टीकाकारांवर मध्यम वर्गीय दुराग्रही वृत्तीचा आरोप करण्यांत आला. या घटनेचें विश्लेषण करतांना श्री. इव्हान लुआर्ड यांनीं बी. बी. सी. वरील भाषणांत निर्माण केलेले कांहीं प्रश्न १०, सप्टेंबर १९५९ च्या " लिसनर " मध्यें प्रसिद्ध झाले आहेत.

श्रीयुत लुआर्ड म्हणतात कीं, चिनी नेते स्वतःच अधिक वास्तववादी दृष्टिकोण स्वीकारण्याची भाषा बोलत आहेत, आणि असें असूनहि त्यांनीं टीकाकारांवर कठोर हल्ला कां चढवावा हा एक प्रश्नच आहे. याचें उत्तर, ' आपण दिलेल्या कबुलीमुळें आपली








बेअब्रू होऊं नये, आपण चुकलों आणि आपलें विरोधक बरोबर ठरलें असें सिद्ध होऊं नये,' या दृष्टिकोणांत सांपडणें शक्य आहे. शिवाय दिलेल्या कबुलीमुळें गेल्या वर्षापासून अत्यंत परिश्रमपूर्वक वाढविलेला उत्साह मंदावण्याचीहि मीति आहेच!

दुसरा प्रश्न असा कीं, केवळ या वर्षीचे उत्पादनाचे इष्टांक कमी करणेंच नव्हे तर गेल्या वर्षीचा आपण प्रत्यक्ष साधलेला विकास अत्यंत अतिरंजित स्वरूपांत मांडला गेला होता हेंहि मान्य करण्याची आजच चिनी नेत्यांना गरज कां वाटावी? या प्रश्नाचें एक संभवनीय उत्तर शक्य आहे. या वर्षीच्या नैसर्गिक अरिष्टांमुळें अन्नधान्याचा तुटवडा भासूं लागला आहे; आणि गेल्या वर्षी दावा केला जात होता इतकी सुबत्ता देशांत निर्माण झाली नाहीं अशी जाणीव सामान्य जनतेस होऊं लागली आहे. यामुळें जनतेचा विश्वास कायम राखण्यासाठीं स्पष्ट कबुली देणें आवश्यक झालें असावें.

तिसरा प्रश्न असा उद्भवतो कीं, पूर्वीचे आकडे अतिरंजित होते ही गोष्ट चिनी नेत्यांना आरंभापासून माहित होती काय? यासंबंधी श्रीयुत लुआर्ड म्हणतात कीं, त्यांनीं उत्पादनाचे आंकडे मुद्दाम वाढवून जनतेची फसवणूक केली असें गृहीत धरण्याकरितां कांहीं आधार नाहीं; कांहीं अंशीं याबाबतींत इच्छानुगामी विचार जबाबदार ठरले असण्याचा संभव आहे. स्थानिक अधिकाऱ्यांनीं मोठमोठे उच्चांक गांठण्याच्या अहमहमिकेस बळी पडून आंकडे दिले आणि सरकारी खात्यांनीं ते प्रसिद्ध केले असें असण्याचा संभव आहे. या उत्साहपूर्ण वातावरणांत केला जाणारा दावा अतिरंजित असल्याची गोष्ट कांहीं वास्तववादी ओळखून होते पण त्यांच्या सभोंवतालचें वातावरणच असें होतें कीं त्या योगानें त्यांना ही गोष्ट स्पष्ट सांगणें कठीण होतें. यामुळें चिनी नेत्यांच्या ठिकाणीं आर्थिक परिस्थितीचा अधिक वास्तववादी दृष्टिकोणांतून विचार करण्याची प्रवृत्ति आतां निर्माण झाली असल्यास ती एक समाधानाची बाब म्हटली पाहिजे. तथापि, यामुळें चिनी प्रगति मंदावणार आहे असा गैरसमज करून घेण्याचें कारण नाहीं. प्रगतीचा वेग कमी झाला असला तरीहि तो भरपूर आहे. आजहि प्रसिद्ध होणाऱ्या आंकड्यांमध्यें अतिशयोक्ति असेल, नाहीं असें नाहीं; तथापि तिच्या योगानें आपण आत्म-संतुष्ट होणें धोक्याचें आहे.

श्रीयुत लुआर्ड यांनीं दिलेला इशारा अत्यंत महत्त्वाचा आहे. भारत व चीन ह्यांच्या सरहद्दीवर होत असलेल्या चिनी आक्रमणाचा या विकास कार्यक्रमाच्या बोजवाऱ्याशीं संबंध जोडला जातो आणि अंतर्गत असंतोषावर एक उपाय म्हणून हें आक्रमण चीननें सुरूं केलें असावें असें म्हणण्यांत येतें. ह्या म्हणण्यांत थोडेंबहुत तथ्य असेलहि, परंतु त्यावरून काढावयाचा निष्कर्ष मात्र सावधानपणाचाच असला पाहिजे यांत शंका नाहीं.

## पाश्चात्त्य राज्यें विरुद्ध पाश्चात्य मूल्यें

'डायोजिनिस' (२६) मध्यें आशियाच्या बौद्धिक जीवनावर एक अत्यंत मौलिक लेख प्रसिद्ध झाला आहे. श्रीमती निकीकेडी यांच्या वरील मथळ्याच्या या लेखांतील महत्त्वाचा भाग पुढें देत आहोत:

आशियाचें बौद्धिक जीवन वैविध्यपूर्ण व गुंतागुंतीचें आहे. पाश्चात्य राष्ट्रांहून तें भिन्न असलें तरी कांहीं प्रमाणांत त्यांत सारखेपणाहि आहे. एकेकाळीं तेथें परंपरेचें स्थान हळुहळु पाश्चात्त्य दृष्टिकोण घेत आहेसें वाटत होतें. तथापि साम्यवाद आणि बुद्धिविरोधक उजव्या विचारसरणी यांनीं त्यांत गुंतागुंत निर्माण केली आहे. आणि साम्यवाद पाश्चात्त्य असला तरी पाश्चात्त्य साम्राज्यवादाशीं त्याचा संबंध नव्हता ही गोष्ट उल्लखनीय आहे.

तत्त्वज्ञान, नीतिशास्त्र व श्रद्धा या बाबतींत आशियाई राष्ट्रांत कितीहि वैचित्र्य आढळलें तरी



अनुक्रमणिका







सामाजिक व राजकीय दृष्टिकोणाच्या बाबतींत त्यांच्यांत बरेंच साम्यहि आहे. जपानचा अपवाद वगळल्यास सामाजिक जीवनांत स्थैर्य व उच्चहीनता यांचें प्राबल्य होतें व प्रगतीची कल्पनाहि अस्तित्वांत नव्हती. पाश्चात्य राष्ट्रांशीं आलेल्या संबंधामुळेंच मूलगामी सामाजिक पुनर्रचनेचा विचार तेथें आला आहे. आणि या संबंधांतूनच पश्चिमेविषयीच्या आशियांतील द्विधा मनोवृत्तीचा उलगडा होऊं शकतो. पाश्चात्य मूल्यें व कर्तृत्व याविषयीं अनेकांना आकर्षण वाटतें; आणि त्याबरोबरच पाश्चात्यांनीं आशियांत जें कांहीं केलें त्याबद्दल तिरस्कारहि. बौद्धिक प्रतिक्रियेंतहि असाच दुहेरीपणा आहे. बाह्य व परंपरागत मूल्यांचें संकलन केलें पाहिजे असें अनेक म्हणतात; तथापि प्रयत्न मात्र बाहेरचे विचार वा मूल्यें हीं बाहेरील नव्हत हें सिद्ध करण्याचा. यामुळें कांहीं वेळां "पाश्चात्य" मूल्यांना "आधुनिक" म्हटलें जातें. अर्थात् ही संज्ञा अधिक शास्त्रशुद्ध आहे हा भाग निराळा.

पश्चिमेचें आव्हान स्वीकारूं पहाणाऱ्या व परंपरेचें रक्षण करूं इच्छिणाऱ्या मुख्य आशियाई प्रवृत्ती पुढीलप्रमाणें सांगतां येतील : (१) हें आव्हान स्वीकारण्यासाठीं मुळांतील विरोधी वा भिन्न परंपरांना एकत्र आणण्याची प्रवृत्ति (२) परंपरेचे सुसंगत विचार वा श्रद्धास्थान म्हणून नव्हे तर केवळ भावनांच्या आश्रयानें समर्थन करणारी प्रवृत्ति. परंपरेंत संगति वा परिणामकारकता शोधायची नसते; तिचें भारून टाकणारें विराट् स्वरूप हेंच मोलाचें होय ही कल्पना यांत आहे. (३) आपल्या संस्कृतींतील आध्यात्मिक व बौद्धिक मूल्यें कायम राखून पश्चिमेकडून हवी तर भौतिक क्षेत्रापुरती उसनवारी घ्यावी हा विचार. हाच पुढें "पश्चिम जडवादी व पूर्व अध्यात्मवादी" असा आग्रह निर्माण करतो.

परंपरेला आधुनिक स्वरूप देऊं इच्छिणारामध्येंहि अशाच प्रकारें कांहीं सामान्य प्रवृत्ती आढळतात. उदा० (१) कांहीं सहज अनुसरता येण्यासारख्या सुलभ गोष्टींत पश्चिमेचें खरें 'रहस्य' सामावलें आहे असें मानणें, 'घटनात्मक'वर्तन, धर्म व राज्य हीं अलग करणें, "स्व-राज्य" इत्यादि अशीं उदाहरणें सांगतां येतील. (२) प्रबल परंपरेचे नवे अर्थ लावून तिला आधुनिक जीवनाशीं सुसंगत स्वरूप देणें. ह्याबरोबरच जुन्या परंपरेंत आधुनिक अर्थ शोधण्याची प्रवृत्तिहि कांहीं वेळां आढळते; व आपली परंपरा वैज्ञानिक, लोकशाही, इतकेंच नव्हे तर समाजवादीहि होती असा आग्रह धरला जातो. (३) परंपरेकडे बव्हंशीं दुर्लक्ष करणारी परंतु तिचें स्वरूप मात्र पाश्चात्य मूल्यांशीं विसंगत नाहीं असा आग्रह धरणारी प्रवृत्ति.

कांहीं बुद्धिमंत परंपरावाद व आधुनिक दृष्टिकोण हीं दोन्हीहि न स्वीकारतां मधला मार्ग अवलंबितात. या मधल्या दृष्टिकोणांतून प्रकट होणाऱ्या कांहीं सामान्य प्रवृत्ती पुढीलप्रमाणें सांगतां येतील : (१) राष्ट्रवाद. यांत परिस्थित्यनुरुप परंपरावादी, सुधारणावादी, मूर्तिभंजक इत्यादि विविध भूमिका मोडतात. (२) कांहीं वेळां एकच व्यक्ति सुरवातीस पश्चिमेकडे आकर्षित झालेली व नंतर परंपरावादी बनलेली दिसते. (३) रशिया-जपान युद्ध (१९०५), पहिलें महायुद्ध, रशियन राज्यक्रांति, आर्थिक अरिष्टें इत्यादि कांहीं ऐतिहासिक घटनांचा आशियांत सर्वत्र खोल परिणाम झालेला दिसतो. (४) बौद्धिक भूमिकांत झपाट्यानें होणारे बदल. एकतर गेल्या शंभर वर्षांत युरोपच्या मानानें आशियाला कितीतरी मोठें बौद्धिक अंतर तोडावें लागलें आहे; व दुसरें म्हणजे आशियापुढील आजच्या समस्याच अशा आहेत कीं त्यावर परंपरागत आशियाई वा पाश्चात्य दृष्टिकोणांतून समाधानकारक उत्तर मिळूं शकत नाहीं. यामुळें पाश्चात्य आव्हानाला एका पिढीकरवीं दिलें जाणारें उत्तर पुढच्या पिढीला मान्य असत नाहीं; आणि



अनुक्रमणिका







जुन्या विचारवंतांविषयीं आदर व्यक्त करणारे लोक ते विचार मात्र सतत बदलत असतांना दिसतात.

वर उल्लेखिलेल्या सामान्य प्रवृत्तींबरोबर निरनिराळया राष्ट्रांचा विशिष्ट इतिहास व परंपरा यांना अनुलक्षून त्यांच्या बौद्धिक जीवनांत भिन्नत्व निर्माण झालें असल्याचें लेखिकेनें नमूद केलें आहे. व या भेदांतून एक सामान्य निष्कर्ष काढला आहे. तो असा कीं, "ज्या देशांत प्रत्यक्ष वसाहतीचें स्थान प्राप्त झालें नाहीं तथापि पाश्चात्य राष्ट्रांशीं ज्यांचा भरपूर संबंध आला त्या देशांतून परंपरागत मूल्यें टाकून पाश्चात्य मूल्यांचा स्वीकार करण्याची प्रवृत्ति अधिकाधिक प्रमाणांत आढळते. उलट, वसाहतींतून मात्र आरंभीं प्रकट झालेली पाश्चात्यांशी एकरूप होण्याची प्रवृत्ति हळुहळु बदलत असून सुधारलेल्या परंपरांचें वर्चस्व प्रस्थापित करण्याकडेच कल झुकला असल्याचें दिसून येतें. असें होण्याचें कारण वसाहतीमध्यें पश्चिमेचा प्रत्यय जुलमी राजवट या नात्यानें येतो आणि परंपरेची पुनः स्थापना करणें हा मुक्ततेचा मार्ग बनतो; उलट इतरत्र जुलूम स्वकीयांकरवीं होत असल्यानें पाश्चात्य मूल्येंहि त्यांतून सुटण्याचा मार्ग दाखवतात. म्हणून वसाहतींत सुधारणावादी प्रवृत्ति पाश्चात्य विचार व मूल्यें स्वीकारतांना दिसते; व हळुहळु भिन्न विचारसरणीच्या आधारें पुढें येणाऱ्या क्रांतिकारक राष्ट्रवादापुढें तिचा पाडाव होतो. अन्यत्र सुधारणावादी विचार परंपरेशीं निगडीत होतो व क्रांतिकारक राष्ट्रवाद हा पश्चिमीकरणाचा संदेश देतांना आढळतो."

अनेक आशियाई राष्ट्रें, त्यांचें सामाजिक जीवन व विचार यांची छाननी करून प्रस्तुत निष्कर्षाची यथार्थता प्रस्थापित करण्याचा लेखिकेनें प्रयत्न केला आहे. व जातिसंस्था, धर्मसंस्था इत्यादींच्या आधारें आशियाई बौद्धिक जीवनाचा उलगडा करण्यांतील अडचणी दाखवल्या आहेत. वर उल्लेख केलेला निष्कर्ष अनेक घटनांचा उलगडा होण्यास उपयुक्त आहे यांत मुळींच संशय नाहीं.

## इस्त्रेलमधील प्रौढ शिक्षणाचीं विद्यालयें

१९४८ सालीं इस्त्रायल हें राष्ट्र अस्तित्वांत आलें आणि सत्तर निरनिराळया देशांतून या ठिकाणीं वास्तव्यासाठीं लोक येऊं लागले. भाषिक दृष्टीनें बोलावयाचें झाल्यास यांतून निर्माण होणाऱ्या गोंधळाची कल्पना करणेंहि कठीण आहे. बहुतेक नवागतांना तेथील राष्ट्रीय भाषेचें— हिब्रूचें – ज्ञानहि नव्हतें. त्याऐवजीं यिदिशला दिनो बोली ( हिब्रू–स्पॅनिश डायलेक्ट ), जर्मन, फ्रेंच, इटालियन, इंग्लिश पर्शियन, अरेबिक, इत्यादि विविध भाषा बोलणारे हे लोक होते. त्यांच्या चालीरीती आणि सामाजिक दृष्टिकोणहि भिन्नभिन्न होते. अशा अवस्थेंत या नवागतांत दर महिन्याला सुमारें ७,५०० या वेगानें वाढ होत असतांना हें राष्ट्र कसें निर्माण करावयाचें हा एक मोठाच प्रश्न होता. आणि या प्रश्नाचें उत्तर शोधण्याच्या धडपडींतूनच "उल्पन" या प्रौढ विद्यालयांचा जन्म झाला. या प्रकारचें पहिलें विद्यालय सप्टेंबर १९४९ मध्यें जेरुसलेमच्या धर्मपीठांत मॉर्डेकाई कामराड यांना आढळलें. या विद्यालयांत दोनशें विद्यार्थी सामील झाले. विविध-प्रकारच्या सामाजिक पार्श्वभूमींतून आलेल्या या विद्यार्थ्यांना इस्त्रायलचें नागरीक बनविणें हा एक अत्यंत गुंतागुंतीचा प्रश्न होता. तो सोडविण्याची कामगिरी या विद्यालयानें बऱ्याच प्रमाणांत यशस्वीरीतीनें पार पाडली आहे. अशा तऱ्हेचीं सुमारें ७० विद्यालयें आज या देशांत आहेत. या विद्यालयांसाठी शिक्षक तयार करण्याची जबाबदारी विद्यापीठांनीं घेतली आहे आणि श्री. मार्टिन बुबेर यांच्या मार्गदर्शनाखालीं हें कार्य सुरूं झालें आहे. या विद्यालयांविषयींची कांहीं माहिती हें आंदोलन सुरूं करणारे श्रीयुत कामराड यांनीं सांगितली आहे; व ती "ॲडल्ट लीडरशिप" या मासिकाच्या सप्टेंबर १९५९ च्या अंकांत प्रसिद्ध झाली आहे.








उल्पन मधील विद्यार्थी हा पांच महिने विद्यालयांतच राहतो आणि दर आठवड्यास ३० तास अध्ययनांत घालवितो. विद्यार्थ्यांना प्रथम कामापुरतें हिब्रू भाषेचें शिक्षण देतां येतें, आणि ही भाषा शिकवितांना त्यांच्या दैनंदिन अनुभवांपासून आरंभ करून हळूंहळूं अमूर्त कल्पनांपर्यंत प्रगति केली जाते. भाषा शिकवितांना व्याकरणावर विशेष भर दिला जात नाही. हिब्रूचें थोडेंबहुत ज्ञान प्राप्त होतांच विद्यार्थी स्थूल स्वरूपांत भूगोल वा इतिहास यांचें अध्ययन सुरूं करतात, आणि त्याबरोबरच चालू घडामोडी व देशांपुढील प्रश्न या विषयींच्या चर्चाहि होत असतात. ईस्त्रायलच्या नव्या संस्कृतीचें विद्यार्थ्यांना योग्य दर्शन व्हावें यासाठीं त्यांचा हळूंहळूं लोक-संगिताशीं परिचय करून दिला जातो. ते हळूंहळूं गाऊं लागतात, स्थानिक साहित्य व नवें साहित्य वाचतात आणि धार्मिक उत्सव साजरे करतात. दररोजच्या अभ्यासक्रमास दैनंदिन घडामोडीपासून आरंभ होतो, वृत्तपत्रांतून आलेल्या वा रेडिओवरून जाहीर झालेल्या बातम्यांची चर्चा होऊं लागते. विद्यार्थ्यांच्या वैयक्तिक प्रश्नांवरहि खुली चर्चा होते. आपण ज्या देशांतून आलों त्या संबंधानें बोलण्याची संधीहि विद्यार्थ्यांना मिळते. नव्या राष्ट्रांतील नागरिकांचीं कर्तव्यें त्यांना समजाऊन दिलीं जातात. त्याचप्रमाणें देशाच्या कायदेमंडळापुढील प्रश्न, शिक्षण पद्धति, मतदान पद्धति, ग्रंथालयांचा उपयोग, इत्यादि गोष्टी त्यांना शिकविल्या जातात. एखाद्या विद्यालयांतील वर्गात दहा-वीस निरनिराळ्या भाषा, कीं ज्या भाषा शिक्षकालाहि अवगत नसतील, बोलणारे विद्यार्थी सांपडणें शक्य आहे. तथापि, त्यांना एकत्रित आणल्यामुळें हळूंहळूं ते एकमेकांशीं परिचित होऊं लागतात. आणि परस्परांशीं करावयाचे नित्यांचे व्यवहार सुलभ व्हावेत यासाठीं हिब्रू शिकूं लागतात व तिचा उपयोगहि करूं लागतात. शिक्षण देण्याच्या पद्धतीहि अत्यंत विविध स्वरूपाच्या आढळतात. चार तासांच्या शिक्षणांत नव्या माहितीसंबंधानें चर्चा आढळेल, सामुदायिक गायन होईल, प्रश्नोत्तरांचा कार्यक्रम असेल, एखादा विद्यार्थी इतरांना कांहीं समजाऊन सांगेल, सहल काढली जाईल अथवा वादविवादहि होईल आणि या सर्व पद्धतींचा अवलंब अगदीं मोकळेपणानें शिक्षक करीत असतात.

विशिष्ट अभ्यासक्रम शिकविणें ही कल्पना या विद्यालयांत मध्यवर्ती नसून विद्यार्थ्यांचे परस्परांशीं संबंध ही त्यांतील केंद्रीय गोष्ट आहे. यामुळेंच विद्यालयांतील शिक्षकांवर अत्यंत मोठी जबाबदारी पडते. म्हणून शिक्षकाच्या तयारीवर, आणि पुन्हा पुन्हा "रिफ्रेशर कोर्सेस"च्या द्वारें त्यांना ट्रेनिंग देण्यांवर विशेष भर दिला जातो. शिक्षकांना विद्यार्थ्यांचें मार्गदर्शन तर करावें लागतेंच पण त्याबरोबरच एखाद्या ऑर्केस्ट्रा चालविणाऱ्या संगीतज्ञाप्रमाणें सर्व समाजाकडे आणि त्यांतील प्रत्येक व्यक्तिकडेहि लक्ष पुरवावें लागतें. कांहीं वेळां एकाच वर्गातील कार्य अनेक शिक्षक सहकार्यानें करीत असतात. या विद्यालयांतून तयार झालेले विद्यार्थी हळूंहळूं हिब्रूत आपला सर्व व्यवहार चालविण्यास समर्थ होतात आणि तेथें मिळालेल्या सहकारी जीवनाच्या अनुभवांतून बाहेरील व्यापक समाजांतील आपापलीं कामें व जबाबदाऱ्या यशस्वीपणें पार पाडूं लागतात असा अनुभव आहे.

## नैसर्गिक शेतीची कैफियत

निसर्ग आणि जीवसृष्टि लाखोंवर्षेपर्यंत मानवावांचून राहिली व मोकळेपणानें वाढत गेली आहे. या विकासक्रमांत मनुष्य पुष्कळच उशीरा आला आहे. तथापि एकदां अवतरल्यानंतर मात्र त्यानें सभोंवतालच्या जीवनावर ताबा मिळविण्यास आरंभ केला. आणि कितीहि संस्कृति येवोत व जावोत, हा क्रम मात्र, सतत चालूं राहणार असें आपण आतां धरूनच चालतो.

दाट लोकवस्तीच्या प्रदेशांत निसर्गाला आळा घातला जाणें अपरिहार्य आहे. त्याचप्रमाणें उत्तम मशागत करायची म्हटलें कीं कित्येक जीव-जंतूवर गंडांतर आलेंच. वाघ, गोरिला वा पाणघोडे यासारख्या मोठ्या व घोकादायक प्राण्यांना नैसर्गिक वस्तिस्थान मोकळ सोडणें अशक्य होतें. आणि आधुनिक जंतुविनाशक द्रव्यांच्या उपयोगामुळें कित्येक लहानसहान प्राणी नाहींसे होऊं लागतात.

सांप्रत मानवी लोकसंख्या २७५ कोटी आहे; या शतकाच्या अखेरीस ती ६०० कोटी होईल असा अंदाज आहे. या वाढत्या संख्येचें निसर्गाच्या साम्राज्यावर अव्याहत आक्रमण सुरू आहे; आणि त्यामुळें अन्य कित्येक प्राणिमात्रांच्या जीवनावर असह्य ताण पडत आहे. भारतांतील सशृंग पाण-घोड्यांची संख्या, संरक्षण असूनहि अवघी ४०० वर येऊन ठेपली आहे; आणि नेपाळांत तर हा प्राणी नाहींसाच होत आहे; आज अवघे ३५ पाण-घोडे तेथें आहेत. सिलोनमधील हत्तींची संख्या-वाढीच्या मानानें दरवर्षी ५० टक्के अधिक प्रमाणांत गेलीं सात वर्षें हत्या सुरू आहे. कॅलिफोर्नियांतील 'कॉंडॉर' अवघे ६० उरले आहेत. अमेरिकेंतील 'हूपिंग क्रेन' १९३८ सालीं १४ होते, १९४९ सालीं ३४ झाले व १९५७ सालीं त्यांची संख्या पुनः २६ वर आली आहे. न्यूझीलंडमधील 'किवी', 'पंडा', मादागास्करमधील 'आय्-आय्' व 'इंद्रिस' हे सारे प्राणी नष्ट होण्याच्या मार्गावर आहेत.

एकाद्या जातीच्या प्राण्यांची संख्या एकदां विशिष्ट पातळीपेक्षां कमी झाली कीं ते विखुरतात, एकाकी बनतात, जननक्रिया थांबते आणि हळुहळु ती जात नष्ट होण्याच्या मार्गाला लागते. आणि नष्ट झाली म्हणजे कायमचीच! नैसर्गिक निवडीनें बदलत्या परिस्थितीला तोंड देण्यासाठीं तिला समर्थ बनवण्याचे मार्ग सांपडतात, नाहीं असें नाहीं. तथापि ही प्रक्रिया अत्यंत संथपणें होते. हळुहळु पुढें सरकणाऱ्या हिमनदीचा मुकाबला तिच्यामुळें होऊं शकतो; झपाट्यानें आक्रमण करणाऱ्या तंत्रविद्येच्या युगांत ती निरुपयोगी ठरते. नैसर्गिक निवडीच्या क्रमाचा 'हेतु' प्राण्यांचें जीवन त्याच्यासाठींच शक्य करणें हा असतो. उलट, आपण ते आपणासाठीं कितपत उपयुक्त आहेत असा प्रश्न विचारतो. सशृंग पाण-घोड्यांची उपयुक्तता व म्हणून वाढ करण्याची आवश्यकता सिद्ध करणें कठिण आहे. तथापि या दृष्टिकोणामुळें कांहीवेळां मात्र अगदीं अनपेक्षित प्राण्यांचें आपण जतन करूं लागतो. उदा. सुसर; उष्ण प्रदेशांतील जलाशयांत पहारा करण्याचें कार्य हा प्राणि उत्तम रीतीनें करू शकतो.

तथापि मानवी जीवनास "उपयुक्त" आणि "आवश्यक" यांत फरक कसा करायचा? कित्येक-वेळां योग्य उत्तरें हीं योग्य प्रश्न विचारण्यावर अवलंबून असतात. सामान्यतः प्राण्यांच्या विविध जातींचा आपण वेगवेगळा विचार करतो; तथापि प्रत्यक्षांत अशा प्रकारें कोणताच प्राणी आढळत नाहीं. तसेंच झाडांचा माणसाला निरनिराळ्या प्रकारें उपयोग होतो. परंतु जंगल म्हणजे केवळ झाडें नव्हत. ज्यांतील कोणताहि भाग अलगपणें सहसा आढळत नाहीं अशी ती एक सामाजिक संघटना आहे. जंगलांचें रक्षण केलें कीं लाखों विविध प्राणिमात्रांचें रक्षणहि आपोआपच होतें.

या दृष्टीनें विचार करूं लागलें म्हणजे निसर्गाचा स्वयंपूर्ण विजेता ही मानवाबद्दलची कल्पना ढासळूं लागते. मनुष्य हा देखील एकाकी स्वरूपांत अस्ति-त्वांत नाहींच. सभोंवतालच्या जीवनांतील त्याचे आधार, जीवनोपयोगी वस्तूंच्या निर्मितीचा नैसर्गिक क्रम, पाणी, ऑक्सिजन, कार्बनडायऑक्साइड इत्यादींपासून त्याला अलग केल्यास त्याचा क्षणांत निकाल लागेल. म्हणून त्याच्या जीवनाला आवश्यक जीवसृष्टीचाच केवळ विचार करणें पुरेसें नाहीं.








उलट विविध प्राणी, त्यांचे व्यवहार व त्यांच्या भोंवतालची परिस्थिती या सर्वांचा साकल्यानें विचार करणें व अशा संकलित वर्तुळांची व्याप्ती सतत वाढवीत जाणें हेंच अधिक युक्त ठरतें.

अशाच प्रकारें एरवीं विरोधी पार्श्वभूमींतून अलग करून उपयोगांत आणण्याची वस्तु असा एकाद्या धान्याच्या पिकासंबंधीं विचार केला जातो तोहि सदोषच म्हटला पाहिजे. पक्षी, कृमिकीटक, झाडेंझुडपें हीं तर विरोधी खरीच; पण प्रत्यक्ष जमीन देखील फारशी अनुकूल नसल्यानें तिच्यावरहि सतत रासायनिक द्रव्यांचा मारा करून जणुं खरा स्वामी कोण हें तिला दाखवावें लागतें! कारण, पिकाखालील जमीन हीहि सजीव असून एका घनयार्डामध्यें तिच्यांत दोन लक्षांइतके जीवजंतु आढळूं शकतात. उपयुक्त व अनुपयुक्त तारतम्यावर त्यांना अलग करणें ठीक; पण रासायनिक द्रव्यें व अन्य उपायांनीं आपण त्यांचा सर्रास निःपात करायचा म्हटल्यास निसर्गहि या आक्रमणाला कडक प्रतिकार केल्यावांचून रहाणार नाहीं.

हीं जंतु व झुडपांचा विनाश करणारीं द्रव्यें जितके प्रश्न सोडवतात तितकेच नवे निर्माणहि करतात. उदा० शेतीस उपयुक्त जंतुनाशक द्रव्यें उत्पादन करणें नुकतेंच एका अमेरिकन कंपनीनें बंद केलें आहे. आणि हा निर्णय चटकन नव्हे, तर बारा वर्षांच्या दीर्घ अनुभव व संशोधनानंतर घेण्यांत आला. त्यांचें म्हणणें असें कीं, "लुसिआनामधील कापूस पिकवणाऱ्या शेतकऱ्यांनीं आमच्या जंतुनाशक द्रव्यांचें स्वागत केलें. आज या भागांत कोणतेंहि जंतुनाशक द्रव्य उपयोगी पडत नाहीं. म्हणजे पूर्वी किडीमुळें पिकाचा कांहीं हिस्सा हातीं लागत नसे; आज मुळीं पिकेंच काढतां येत नाहींत. म्हणून जीवसृष्टींतील नैसर्गिक समतोल पुनः प्रस्थापित होईपर्यंत थांबणें आम्हांस उचित वाटतें."

जोंवर माणसाचें अस्तित्व आहे तोंवर हा समतोल पूर्णपणें साधणें शक्य नाहीं. परंतु सापेक्षतेनें तो साधणें विशेष अडचणीचें नाहीं. एकाद्या विशिष्ट जंतूचें प्रमाण कमी करावेंसें वाटल्यास त्यांच्या नैसर्गिक शत्रूंच्या वाढीस उत्तेजन देणें योग्य होईल. अशा प्रकारें सजीव साधनांचा उपयोग करून समतोल राखण्याच्या उपायांची आतां प्रगति होत आहे. अर्थात् या उपायांना मर्यादा आहेत. संपन्न सजीव सृष्टींतच अनपेक्षित हल्ल्यांच्या प्रतिकार करण्याचें सामर्थ्य आढळतें. उष्ण कटिबंधांतील प्रदेशांत अनेक जीवजंतु आढळतात; पण जंतुनाशक द्रव्यांची गरज भासत नाहीं. नैसर्गिक जंगलांत या बाबत अत्यंत श्रेष्ठ दर्जाची व्यवस्था आढळते. उलट एकाच प्रकारचें इमारती लाकूड निर्माण होणारीं जंगलें, एकच पीक काढणारी शेती वा एकाच जातीच्या प्राण्याची वाढ हीं या दृष्टीनें दुर्बल परिस्थिती निर्माण करतात. यामुळें जमिनीचा संमिश्र उपयोग, मिश्र शेती, आणि अस्तित्वांत असलेल्या जंगलांचें व जीवसृष्टीचें संरक्षण हाच योग्य मार्ग ठरतो. माणसाला अलगपणें जगणें अशक्य आहे. त्यानें जीवसृष्टींतील समतोल कायम राखून जगण्याचा प्रयत्न करणेंच इष्ट होय.

श्री. रॉय ब्रिजर यांनीं "कॉंटेंपररी रिव्ह्यू" च्या जुलै १९५९ च्या अंकांत मांडलेल्या कैफियतीचा थोडक्यांत गोषवारा वर दिला आहे. लेखांतील दृष्टिकोण अत्यंत महत्वाचा व विचारार्ह आहे यांत मुळींच शंका नाहीं.

## आशियाई समाजवादाचें भवितव्य

डॉ. सॉल रोझ यांच्या "सोशिॲलिझम इन सदर्न एशिया" या ग्रंथावर अभिप्राय लिहिण्याच्या निमित्तानें श्रीयुत गाय विंट यांनीं सप्टेंबर १९५९ च्या "सोशिॲलिस्ट कॉमेंटरी" च्या अंकांत आशियाई समाजवादाची चर्चा करणारा एक लेख लिहिला आहे. आशियाई व विशेषतः भारतीय






राजकारणावर अधिकारवाणीनें लिहूं शकणारे श्रीयुत विंट हे एक तज्ज्ञ आहेत, यामुळें त्यांचें म्हणणें अत्यंत विचारार्ह समजलें पाहिजे. त्याचा थोडक्यांत गोषवारा पुढीलप्रमाणें आहे :

कोणत्याहि आशियाई राष्ट्रांत कम्युनिझमपासून भिन्न स्वरूपांत असलेला समाजवाद सत्ताधारी अवस्थेपर्यंत येऊं शकलेला नाहीं. ब्रह्मदेश व सिलोन हे याला अपवाद आहेत. वास्तविक या भू-प्रदेशांत कोणत्या राजकीय पक्षाला समाजवादी पक्ष म्हणावा हाच प्रश्न आहे. कारण कम्युनिस्टे-तर बहुतेक सर्व राजकीय पक्ष आपण समाजवादीच आहोंत वा समाजवादाचे मित्र आहोंत असा दावा करीत असतात. अशाप्रकारें आशियाच्या राजकीय वातावरणांत सर्वत्र समाजवाद पसरत असला तरी खऱ्या समाजवादी पक्षाच भवितव्य मात्र फारसें उज्ज्वल वाटत नाहीं. आशियांतील समाजवादाचे अपयश हें एका परीनें भारतीय समाजवादाच्या अपयशावरच उभें आहे. दक्षिण आशियांतील महत्त्वाचें बौद्धिक व राजकीय केंद्र म्हणजे भारत होय. या प्रदेशांतील अन्य राष्ट्रांपेक्षां घटनात्मक राजकीय जीवन भारतांत अधिक खोलवर रुजलेलें आहे; आणि म्हणून त्या ठिकाणीं लोकशाही समाजवादी आंदोलन मूळ धरूं शकेल अशी अपेक्षा बाळगली जाते. भारतांतील आजचें राजकीय वातावरणहि समाजवादी पक्षाला एखाद्या गटाचें वा हुकूमशाहीचें स्वरूप प्राप्त व्हावें असें नाहीं.

भारतीय राष्ट्रीय काँग्रेस ही राजकीय क्षेत्रांत भक्कम पायावर उभी राहिल्यानंतर भारतीय समाजवादी पक्ष त्या क्षेत्रांत स्वतंत्ररीतीनें आला ही त्यांची एक मोठी अडचण आहे. यामुळें काँग्रेसपासून आपलें भिन्न अस्तित्व ते स्पष्ट करूं शकले नाहींत, किंवा तिला आव्हानहि देऊं शकले नाहींत. काँग्रेसपक्ष हाहि आज स्वत:ला समाजवादी पक्षच म्हणवितो. यामुळें जनतेस देत असलेलीं अभिवचनें समाजवादी केन्द्रांच पुरी करूं शकणार नाहींत; काँग्रेस दूरच्या भविष्यकालांत तरी तीं पुरीं करूं शकेल अशा स्वरूपाचा दोहोंमधील फरक दिसूं लागतो. भारतीय समाजवादी पक्ष अशा रीतीनें अत्यंत अडचणींच्या परिस्थितींत सांपडला आहे. काँग्रेसच्या पुढें जाण्याच्या हेतूनें आत्यंतिक डावी भूमिकाहि त्याला स्वीकारतां येत नाहीं. कारण अशी भूमिका घेणारे कम्युनिस्ट आहेतच. शिवाय अशी भूमिका स्वीकारल्यानें लोकशाही समाजवादापासून दूर जावें लागण्याचा संभव आहे. उलट आपण लोकशाही समाजवाद आणूं असें म्हटल्यानें विशेष कार्यभाग साधत नाहीं. कारण काँग्रेस तो आणण्याचा प्रयत्न करीत आहेच. आपले प्रयत्न काँग्रेसपेक्षां अधिक प्रामाणिक, व्यापक आणि परिपूर्ण आहेत असें समाजवादी म्हणूं शकतात. तथापि, मतदारांना हें कसें पटावें ? भारतीय मतदार हे अजून व्यक्तिगत नेतृत्वाच्या मार्गें जातात ही गोष्ट समाजवाद्यांचें दुर्दैव सूचित करिते. गेल्या ४० वर्षांतील भारतीय राजकारणांतील अत्यंत थोर अशा गांधी व नेहरू या दोन व्यक्ती काँग्रेसचें नेतृत्व करीत आल्या आहेत. यामुळें भावी काळांत इष्ट असा बदल व्हावयाचा असल्यास त्यासाठीं समाजवाद्यांना त्यांच्याशीं तुलना करतां येईल अशा तऱ्हेचा नेता निर्माण करणें आवश्यक आहे; आणि हीच गोष्ट तूर्त तरी शक्य दिसत नाहीं. श्रीयुत जयप्रकाश नारायण यांचें व्यक्तिमत्त्व अशा प्रकारचें आहेहि. पण त्यांनीं राजकीय क्षेत्रांपासून शक्यतों दूर जाण्याचा मार्ग स्वीकारला आहे. श्री. अशोक मेहता हे अत्यंत बुद्धिमान नेते आहेत. पण राजकीय तज्ज्ञ म्हणून त्यांचें स्थान आहे, राष्ट्रीय विभूति म्हणून नव्हे. यामुळें काँग्रेसविरुद्ध लोकांना मतदान करावयाचें झालेंच तर ते जातीय वा कम्युनिस्टपक्षाचीच निवड करतील असा संभव आहे.











भारतांतील ही अडचण केवळ यदृच्छेनें निर्माण झालेली नाहीं. आशियांतील समाजरचनेचें स्वरूपच तिला जबाबदार आहे. जपानचा अपवाद वगळल्यास बहुतेक सर्व देशांत असा एकहि स्वच्छ स्वरूपांतील तात्विक प्रश्न नाहीं कीं, ज्या बाबतींत समाजवाद्यांना आपली म्हणून स्पष्ट भूमिका घेणें शक्य व्हावें. आणि जनतेच्या भावना आकर्षित करण्याच्या बाबतींत राष्ट्रीय पक्ष वा कम्युनिस्ट यांच्यांशीं स्पर्धा करणें त्यांना शक्य नाहीं. कम्युनिस्टांपुरतेंच बोलावयाचें झाल्यास त्यांचें आंतरराष्ट्रीय " धर्मपीठ " आहे; नेत्यांची, हुतात्म्यांची मालिका आहे, व भरपूर धर्मग्रंथ आहेत. या सर्वांच्या पार्श्वभूमीवर समाजवाद्यांचा निभाव कसा लागणार ?

आशियाई समाजवादाचें भवितव्य एका अर्थी पाखंड ( रिव्हिजनिझम ) पसरविण्यांतच आहे. कदाचित यामुळेंच रशिया आणि टीटो यांच्यांतील एका नित्याच्या सामान्य पाखंडाची निर्भर्त्सना चिनी कम्युनिस्टांनीं जीवन-मरणाच्या पातळीवर नेऊन ठेवली असावी. पाखंड वा नवा विचार यांना आशियाई राष्ट्रांत बराच वाव आहे, कारण यांतील बरीच राष्ट्रें पाश्चात्यांच्या आधिपत्याखालीं राहिलीं असल्यानें उदारमतवादी सामाजिक संघटनेची थोडी बहुत भावना अशा राष्ट्रांत आहेच. कम्युनिझममधील क्रूरता त्यांना अमान्य आहे. कम्युनिस्ट हा एक नवा उच्च वर्ण निर्माण होईल असें त्यांना वाटतें; त्यांची अनियंत्रित सत्ता प्रस्थापित व्हावी हें त्यांना नको आहे. यामुळें आशियांत समाजवादाची लोकशाहीमूल्यांशी सांगड घातली जाण्याचा संभव आहे. तथापि या दृष्टीनें विचार केल्यास भारतीय समाजवाद्यामध्यें नव्या विचारांचा अभाव आढळतो ही खेदाची गोष्ट आहे. श्रीयुत जयप्रकाश नारायण हें एक अपवादभूत उदाहरण बाजूस ठेवल्यास भारतीय समाजवाद्यांनी नवे विचार, नवीं पाखंडें, नवे वाद निर्माण केलेले नाहींत. या दृष्टीनें भारतीय कम्युनिस्टांशीं त्यांची तुलना केल्यास समाजवाद्यांना गौणत्व द्यावें लागतें. भारतीय कम्युनिस्टांनीं मोठे तत्त्ववेत्ते वा विचारवंत निर्माण केलेले नाहीत. अथवा चिनी कम्युनिस्टांप्रमाणें मोठे कार्यकर्तेहि त्याच्यांत आढळत नाहींत. हें जरी खरें असलें तरी त्यांच्या लेखांत कांहीं प्रसंगीं स्वतंत्र प्रकारचा जोम व्यक्त होतो. भारतीय समाजवाद्यांचें तसें नाहीं. वैचारिक दृष्टीनें पाहिल्यास त्यांचें लिखाण हें नवीन कांहींच निर्माण करीत नाहीं. आणि नवें सांगण्यासारखें जवळ कांहींच नसल्यानें नव्या कृतीचीहि त्यांच्यापासून आशा वाटत नाहीं.

---

प्रा. सदाशिव आठवले

# आद्य विश्वामित्र

## विश्वामित्राची प्रतिसृष्टि

प्राचीन भारतीय वाङ्मयांत विश्वामित्र हा एक लेखकांचा आणि कवींचा आवडता विषय आहे. आणि ज्या अर्थी तो वारंवार साहित्यसृष्टींत ओढला जातो त्याअर्थी तो तत्कालीन वाचकांचा आणि श्रोत्यांचाहि तितकाच आवडता असावा. निरनिराळ्या वर्णजातींच्या आणि अनेक प्रकारच्या स्वभावांच्या लेखक–वाचकांना तो अर्थातच भिन्न भिन्न कारणांनीं आवडलेला असणार. कांहींचा तो नायक तर इतरांचा खलनायक आणि सर्व प्रकारच्या अभिरुचींच्या आणि आशा-आकांक्षांच्या श्रोत्यांना रस वाटेल अशी कांहीं अद्‌भुतता, अशीं कांहीं वैचित्र्यें त्याच्या चरित्रांत आहेतहि. ब्राह्मणांच्या वर्चस्वाविरुद्ध दंड थोपटून उभा राहिलेला राजा विश्वामित्र; खडतर तपश्चर्येंत आणि अविरत अध्ययनांत वर्षानुवर्षें घालविणारा त्यागी विश्वामित्र; त्रिशंकूला दिलासा देणारा, प्रतिसृष्टीची भाषा बोलणारा पराक्रमी विश्वामित्र; यूपाला बांधलेल्या शुनःशेपाला सोडवून आणून मांडीवर घेणारा कारुण्यमूर्ति विश्वामित्र आणि त्याचप्रमाणें तप अर्ध्यावर सोडून विश्वसुंदरी मेनकेच्या मागें धांवणारा कामलोलुप विश्वामित्र; वसिष्ठाच्या मुलाचा खून पाडणारा क्रूर विश्वामित्र; सत्यनिष्ठ हरिश्चंद्राचे आणि त्याच्या कुटुंबाचे हाल हाल करणारा निर्दय विश्वामित्र; कितीतरी भूमिकांतून तो प्राचीन साहित्यांत उभा केलेला आहे. प्राचीन साहित्यांतून आणि दंतकथांतून चालत आलेल्या विश्वामित्राच्या गोष्टी आजहि घरोघरीं सांगण्यांत येतात. आज त्याच्यावर एखादां चित्रपटहि काढला जातो. विश्वामित्राच्या जीवनांतील प्रसंग हे नृत्यविषयहि झाले आहेत. अर्थात् हा सगळा भाबड्या कुतूहलाचा मामला आहे. त्यातला सत्यांश शोधणें हें इतिहासाचें काम.

विश्वामित्र काल्पनिक वाङ्मयीन पात्र कीं खरी ऐतिहासिक व्यक्ति ? खरोखरी सांगितलें जातें तें सगळें विश्वामित्रानें केलें काय ? सांगितलें जातें तेवढेंच केलें कीं त्याहून जास्त आणखी कांहीं केलें ? त्याच्या संबंधींच्या हकीकतींतून अतिशयोक्ति, अतिरंजन कुठें आहे ? तें कां झालें आहे ? जें जें विश्वामित्राच्या नांवावर मोडतें तें सगळें एकाच विश्वामित्राचें कर्तृत्व कां ह्या नांवाच्या अनेक व्यक्तींचें ? असे प्रश्न उपस्थित करून त्याचीं जास्तींत जास्त संभवनीय उत्तरें शोधणें हा इतिहासाभ्यासकाचा दृष्टिकोन असला पाहिजे. हुडकून काढलेलें ऐतिहासिक सत्य कदाचित् नीरस असेल, कदाचित् कथाकाव्यापेक्षांहि अधिक आकर्षक आणि रोमांचकारी असेल. कांहीं असलें तरी इतिहास कथनाचें काम करायचें तें मात्र कल्हणानें म्हटल्याप्रमाणें :—

> श्लाघ्यःस एव गुणवान् रागद्वेषबहिष्कृता ।
> सत्यार्थकथने यस्य स्थेयस्येव सरस्वती ॥[1]

—ह्या भावनेनेंच. अर्थात् लेखक काय किंवा वाचक काय इतका "गुणवान्" असणें जरा कठीणच !

वर उपस्थित केलेल्या प्रश्नांचीं उत्तरें ह्या लेखांकांत द्यावयाचीं नाहींत. विश्वामित्र ही ऐतिहासिक व्यक्ति होती हें येथें गृहीत धरावयाचें आहे ( पुढें एखाद्या लेखांकांत तें सिद्ध करण्याची जबाबदारी अर्थातच् लेखकावर राहते ) त्याचप्रमाणें प्राचीन

१. राजतरंगिणी ७।११३७.








काळीं होऊन गेलेल्या अनेक विश्वामित्रांपैकीं आद्य विश्वामित्राचें चरित्र आपण पहात आहोंत हेंहि लक्षांत घ्यावयाचें आहे.

## आद्य विश्वामित्र आणि त्रिशंकु

आद्य विश्वामित्रासंबंधीच्या अनेक गोष्टींपैकीं त्याचा त्रिशंकु नामक राजाशी आलेला संबंध आणि त्यांतून निघालेलें प्रतिसृष्टीचें प्रकरण ही एक मोठी विलक्षण आणि रोमहर्षक कथा आहे.

त्रिशंकु हा अयोध्येचा राजा. पुराणांतील आणि रामायणांतील वंशावळयांत त्याच्या पुढच्या मागच्या पिढ्यांच्या तपशीलांत फरक असले तरी एवढ्यापुरती सर्व आधारांची एकवाक्यता आहे. वसिष्ठाच्या शापानें हा त्रिशंकु झाला; पण याचें मूळचें नांव सत्यव्रत. हा एक हूड आणि आडदांड राजपुत्र होता ह्यांत संशय दिसत नाहीं.[२] भर विवाहमंडपांतून यानें एक ब्राह्मण वधू पळविली. तेव्हां ह्याचा पिता संतापला. अयोध्येचा राजोपाध्याय वसिष्ठहि चिडला आणि सत्यव्रताला हद्दपार करण्यांत आलें.[३] आणि खिन्न झालेला राजाहि पुत्राच्या पाठोपाठ परंतु पुत्र गेला तिकडेच नव्हे तर दुसरीकडे कुठें तरी तपश्चर्या करण्यासाठीं गेला.[४] वसिष्ठ स्वतः राज्यकारभार पाहूं लागला. सत्यव्रत उच्छृंखल होता हें तर खरेंच; पण एका दुर्वर्तनाबद्दल त्याला हद्दपार करणें, पाठोपाठ त्याचा बापहि सुपुत्रप्राप्तीकरतां तपश्चर्येला जाणें आणि लगेच वसिष्ठानें राज्यभार हातीं घेणें ह्या गोष्टी अगदीं सहजच घडल्या असतील असें नव्हे. वसिष्ठाचे हेतु आणि मार्ग सरळच असतील असें म्हणवत नाहीं. सत्यव्रतानें असा मुद्दा काढला कीं, मी ब्राह्मण वधू पळविण्याचा प्रयत्न केला हें खरें; पण हा अपहार सप्तपदीचा विधि होण्यापूर्वी केला असल्यामुळें मी निर्दोषी सुटूं शकेन. वसिष्ठानें असा शास्त्राधार आपल्या वडिलांना सांगून आपल्याला वांचवावें अशी त्रिशंकूची इच्छा होती. पण वसिष्ठानें तें केलें नाहीं. सत्यव्रतानें काढलेला मुद्दा नीतीला धरून नाहीं. स्वैच्छाचार करून शास्त्रामार्गे दडण्याची नेहमींचीच क्लृप्ति आहे ही, परंतु ह्याला दुसरीहि बाजू आहे. सत्यव्रत पुढील आयुष्यांत सतत सदाचरणी, धार्मिक राहिलेला दिसतो. तो जात्या वाईट नव्हता असें खुद्द वसिष्ठाचेंहि मत असावें.[५] तेव्हां तारुण्यांतल्या एखाद्या प्रमादाकडे क्षमाशीलतेनें पाहतां आलें असतें. हद्दपारीपेक्षां सौम्य शिक्षा करतां आली असती. केल्या प्रकारांत दुर्जनतेपेक्षां पोरकटपणाचा, उतावळेपणाचा आणि साहसाचें प्रदर्शन करण्याचा भागच जास्त आहे असा पुराणकारांचा सूर आहे.[६] वसिष्ठानें जास्त कडकपणा दाखविला असें स्वतः त्रिशंकूला तर वाटलेंच आणि पुराणकारहि त्रिशंकूच्या बाजूला थोडेसे कलल्यासारखे स्पष्ट दिसतात.

नगरांतली कुत्रीं मारून त्यांच्या मांसावर उपजीविका करणाऱ्या एका जमातीच्या (श्वपाक) वस्तींत, अयोध्येच्या जवळपासच त्रिशंकू राहायला गेला. तेथें त्याचा विश्वामित्राशीं केवळ योगायोगानेंच संबंध

---

२. लिङ्गपुराण १।६६; ब्रह्मपुराण ५।९९ वगैरे.

३. कित्ता.

४. लिङ्ग० १।६६।७ ; ब्रह्म. ५।१०४, ब्रह्मांड. ३।६३।९५-९७.

५. हरिवंश १।१३.

६. " बाल्यात्कामाच्चमोहाच्च साहसाच्चापलेन च ।
जहार कन्यां कामार्तः कस्यचित् पुरवासिनः ॥
— ब्रह्म. ५।९९, ब्रह्मांड ३।६३।७८.

७. ब्रह्म० ५।१०३; ब्रह्मांड० ३।६३, वगैरे.



अनुक्रमणिका

आला असेल असें नाहीं. विश्वामित्रानें तोपर्यंत आपल्या कर्तृत्वानें नांव केलें होतें. पुन्हां राज्यप्राप्ति होण्यासाठीं विश्वामित्रासारख्या खंबीर लढवय्याचें आपणांस चागलेंच साहाय्य होऊं शकेल हें त्रिशंकूच्या लक्षांत येणें कांहीं मोठेसें कठीण नव्हतें. त्यांतून विश्वामित्राचा ब्राह्मणत्व वगैरे प्रकरणांत मुख्य तंटा मुळीं वसिष्ठाशींच. तेव्हां अयोध्येच्या आसमंतांतील अरण्यांत सत्यव्रत आणि विश्वामित्र ह्यांचें मेतकूट जमणें अत्यंत स्वाभाविक होतें. आपल्या बायकोला आणि तीन मुलांना एका आश्रमांत ठेवून विश्वामित्र कुठें तरी भटकत होता. बायकोपोरांची काळजी त्याला बेताचीच. अयोध्या प्रांतांत त्यावेळीं मोठा दुष्काळ पडलेला. विश्वामित्राच्या कुटुंबाची उपासमार होत होती. कांहीं दयाबुद्धीनें आणि कांहीं स्वहितावर नजर ठेवून सत्यव्रत विश्वामित्राच्या स्त्रीपुत्रांची जेवण्याखाण्याची व्यवस्था पाहूं लागला.[८] परिश्रमानें मांस मिळवून आणायचें आणि आश्रमाबाहेर झाडाला टांगून ठेवायचें असा त्यानें क्रम ठेवला. मुलांना चार घास मिळूं लागले. मुलगा विकायला निघालेल्या विश्वामित्राच्या बायकोला थोडा आधार मिळाला.

दुष्काळाचें स्वरूप उग्र होतें; रानांत पशुपक्षी तरी किती दिवस मिळणार ? विश्वामित्राच्या कुटुंबाला पोसण्याची नैतिक जबाबदारी तर सत्यव्रतानें आपल्या डोक्यांवर घेतलेली. एकदां वनांत कांहीं मिळेना तेव्हां सत्यव्रत नगरांतच शिरला आणि तेथें त्यानें कशावर डल्ला मारावा ? खुद्द वसिष्ठाची कामधेनूच त्याची अत्यंत आवडती गाय, त्यानें मारली. तेव्हां वसिष्ठानें म्हणे त्याला शाप दिला आणि सत्यव्रताच्या डोक्यावर तीन शंकु उगवले; आणि तो त्रिशंकु म्हणून ओळखला जाऊं लागला. शापाची भाकडकथा सोडून देऊं. सत्यांश उरतो तो असा कीं नाइलाजानें म्हणा किंवा मुद्दाम सूडानें म्हणा सत्यव्रतानें वसिष्ठाची गाय मारली आणि त्यामुळें त्या दोघांमधील भांडण आणि पुढें पर्यायानें वसिष्ठ विश्वामित्रांमधील वैर अधिकच पेटलें.[९]

आपल्या गैरहजेरीत, अशा दुष्काळाच्या दिवसांत त्रिशंकूनें आपल्या कुटुंबाचें पोषण केल्याचें कळल्यावर विश्वामित्र साहजिकच सत्यव्रतावर प्रसन्न झाला आणि सर्वस्व पणाला लावून त्यानें सत्यव्रताला अयोध्येच्या गादीवर बसविण्याचें ठरविलें. हें काम फारसें कठीण गेलें नाहीं. वसिष्ठाचें राज्य जनतेला प्रिय झालें नव्हतें, दुष्काळाचें निवारण तो करूं शकला नव्हता. लोकांचा अथवा सैन्याचा कुणाचाच पाठिंबा वसिष्ठाला नसल्यामुळें अयोध्येचा खरा वारस गादीवर येण्यांत कसलीच अडचण आली नाहीं. सत्यव्रताचें स्वागत झालें आणि तो अयोध्येचा राजा झाला हे पार्जिटरचे निष्कर्ष अगदीं बरोबर दिसतात,[१०] आणि गादीवर आल्यानंतर त्रिशंकूनें जो एक विचित्र राजहट्ट घेतला त्यांतून प्रतिसृष्टीचें प्रकरण उद्भवलें, तें आतां पाहावयाचें आहे.

### त्रिशंकूच्या सदेह स्वर्गारोहणाचें मर्म

सत्यव्रताच्या सुपीक मेंदूंत सदेह स्वर्गांत जाण्याची कल्पना आली. आणि एखाद्या यज्ञानें हें काम झालें पाहिजे अशी त्याची भावना. कारण यज्ञानें तें मिळूं शकते असा तत्कालीनांना विश्वास असे. पुरोहित तशीं अभिवचनें देत. जगताचें कारणच यज्ञ. आयुष्याचें सार्थक यज्ञ. इहलोकींचीं सर्व सुखें यज्ञानें प्राप्त होतात. यज्ञानें गाई मिळतात, जमीन मिळते,

८. " ... तुष्ट्यर्थमनुकम्पार्थमेव च । " ब्रह्म० ५।९९ वगैरे.

९. – भागवत ९।७।७ वगैरे.

१०. " As soon as Vis'vamitra championed Satyavrata's cause, he could succeed without any conflict. Vassihtha commanded no support either from the army or from the people. " ( 899-903 ). – JRAS 1913








राज्य मिळतें, सुंदर स्त्रिया मिळतात, पुत्रप्राप्ति होते; शत्रूंचा बदोबस्त होतो. मेल्यावर स्वर्गाची खात्री यज्ञानेंच. त्रिशंकूला फक्त एक पाऊल पुढें टाकायचें होतें. त्याला स्वर्ग जिवंतपणीच हवा होता. बरें, सदेह स्वर्गाला जाणें ही गोष्ट तेव्हां कांहीं अशक्य मानीत नसत. कवि आणि कथाकार तशा गोष्टी निश्चयपूर्वक सांगत. कित्येक ऋषि स्वर्गात हिंडून देवांशी बातचीत करून आलेले होते. आणि स्वर्गात देवांना साहाय्य करायला पृथ्वीवरचे राजे धांवून जात! तेव्हां सदेह स्वर्गगमन शक्य आहे हा एक भाग आणि यज्ञानें वाटेल ती इच्छा पुरी होऊं शकते हा दुसरा भाग. ह्यांचा एकत्रित विचार होऊन सदेह स्वर्गगमन घडविणारा विशिष्ट यज्ञ असला पाहिजे असे त्रिशंकूला का वाटूं नये?

कदाचित् गादीवर बसण्यापूर्वीच त्रिशंकूचें आणि विश्वामित्राचें सदेह स्वर्गगमनाविषयीं बोलणें झालें असतें.[११] तथापि सत्यव्रताच्या राज्यारोहणानंतर विश्वामित्र फिरून ताबडतोब तपश्चर्येला गेलेला दिसतो. आणि वसिष्ठ अयोध्येंत बहुधा राजोपाध्यायाची भूमिका पूर्वीप्रमाणेंच बजावीत, मुक्काम ठोकून राहिलेला दिसतो. कारण ह्या विशिष्ट यज्ञाचें बोलणें तो प्रथम करतो तें वसिष्ठाशींच! वसिष्ठानें तत्काळ ही गोष्ट अशक्य आहे असें सांगितलें.[१२] वसिष्ठ तसा शहाणा होता. मेल्यावर स्वर्गप्राप्ती होईल असें अभिवचन देणें सोपें आहे; सुरक्षितपणाचें आहे, पण जिवंतपणीं स्वर्गात पाठवतो असें सांगायचें कसें? यज्ञानं ही गोष्ट सिद्ध होत नाहीं हें काय वसिष्ठासारख्या पुरोहितांना ठाऊक नसे? त्रिशंकूसारखा राजा सांगितल्याप्रमाणें जिवंत स्वर्गाला गेला नाहीं तर आपल्याला जिवंत जाळील हें वसिष्ठाला समजत होतें. म्हणून त्यानें स्पष्ट नकार दिला. वसिष्ठानें निराश केल्यावर त्रिशंकू तप करीत बसलेल्या त्याच्या पुत्रांकडे जातो. वसिष्ठाविरुद्ध त्याच्या पुत्रांना उठवून आपलें काम साधायचें असा कांहीं त्रिशंकूचा हेतु येथें दिसत नाहीं. पुत्रांमार्फत वसिष्ठाला भीड, गळ घालावी असा त्याचा बेत. पण वसिष्ठाचे मुलगे एकदम संतापले. इक्ष्वाकुवंशीय राजानें राजपुरोहिताचा इथें अपमान केला असा त्यांनीं अर्थ लावला आणि विश्वासानें आलेल्या त्रिशंकूला नाना तऱ्हेचीं दूषणें दिलीं. सगळें ऐकून घेतल्यावर त्रिशंकूनें नम्रपणें सांगितलें कीं तुमचें आणि तुमच्या श्रेष्ठ पित्याचं म्हणणें मला समजलें; परंतु सदेह स्वर्गगमनाचें माझें ध्येय कायम आहे आणि आतां मला दुसरा कांहीं तरी मार्ग पाहणें भाग आहे. हें ऐकल्यावर तर वसिष्ठपुत्रांच्या तळपायाची आग मस्तकीं गेली. त्यांनीं राजाला शापिलें आणि ऋषिपुत्रांच्या जिव्हांच्या फटकाऱ्यांनिशीं त्रिशंकू तत्काळ 'चांडाल' झाला. प्रत्यक्ष त्याचें रूप पालटून तो चांडाल दिसूं लागला वगैरे पुराण काव्यांतरींच्या वर्णनाचा[१३] अर्थ इतकाच कीं पुरोहितांच्या शब्दाला घाबरणाऱ्या वर्णजातिरूप समाजांत जनता खुद्द राजालाहि चांडाल मानूं लागली.

अशा तऱ्हेनें झिडकारला गेलेला राजा कुरुक्षेत्रीं विश्वामित्राच्या आश्रमाकडे गेला. तेथें विश्वामित्राच्या शिष्यानीहि त्याला चांडाल म्हणून झिडकारलेंच.[१४]

खुद्द विश्वामित्रानें मात्र त्रिशंकूची निराशा केली नाहीं. मी गुणानें ब्राह्मण आहे आणि म्हणून जन्मानें क्षत्रिय असलों तरी मी ब्राह्मणच असा ठणठणीत दावा मांडणारा विश्वामित्र त्रिशंकूच्या त्या चांडाल-

---

११. हरिवंश १।१३.

१२. रामायण : बालकाण्ड ५७।१३.

१३. कित्ता ५८।६–१० वगैरे.

१४. स्कंद० ६।४।१६–१८.










त्याचा कां बाऊ करणार होता ?[१५] त्रिशंकू दैवापुढें कुणाचें काय चालायचें आहे[१६] असे हताश उद्गार काढीत विश्वामित्राकडे आला खरा; पण मनांतून, दैवावर मात करून पुरुषप्रयत्नानें एखादी गोष्ट प्राप्त करून देईल तर तो विश्वामित्रच असें त्याला वाटत होतें. विश्वामित्राचीहि जिद्द तशीच होती.[१७] तुला सदेह स्वर्ग हवा आहे एवढंच ना; मिळालाच म्हणून समज, कारण तूं ह्या विश्वामित्राला शरण आला आहेस[१८] असा दिलासा देऊन विश्वामित्र यज्ञाच्या तयारीला लागला.

येथे हें लक्षांत घेणें आवश्यक आहे कीं विश्वामित्र आपल्या वैचारिक प्रगतीच्या ह्या विशिष्ट टप्प्यावर तत्कालीनांच्याहून फारसा निराळा नाहीं. वसिष्ठाला आणि त्याच्या पुत्रांना जें अशक्य वाटतें, इतर पुरोहित जें मिळवून देऊं शकणार नाहींत तें मी मिळवून दाखवीन अशी हिम्मत तो बाळगतो आहे. पण ह्यांत मूलगामी बुद्धीपेक्षां मर्दानी वीरश्रीच जास्त आहे. यज्ञानें स्वर्गगमन शक्य आहे, सदेह स्वर्गगमनहि शक्य आहे असें बिचाऱ्याला निश्चितपणें वाटतें आहे !

यज्ञाची तयारी झाली. सर्वांना बोलावणीं गेलीं. मंडळींनी आमंत्रणें स्वीकारलींहि. फक्त 'येत नाहीं' म्हणून चोख निरोप आला तो एका वसिष्ठाचाच. वसिष्ठानें न येण्याचें कारण दिलें तेहि लक्षांत घेण्यासारखें आहे. सदेह स्वर्गगमन प्राप्त करून देणारा यज्ञ अशक्य असें तो सुरवातीस म्हणाला असला तरी आतां त्याची त्या मुद्यावर हरकत दिसत नव्हती. आतां तो म्हणतो आहे : "ह्या असल्या यज्ञाला कोणी यावें ?" — असल्या म्हणजे जिथे क्षत्रिय पुरोहित आहे आणि चांडाळ यजमान आहे अशा ![१९] वसिष्ठ वर्णव्यवस्थेचा, जन्मानें प्राप्त होणाऱ्या उच्चनीचतेचा कट्टा पुरस्कर्ता. पुराणकार सांगतात कीं ह्या यज्ञाला देव येईनात. ! नाहीं तरी देव येणें म्हणजे काय ? देव आले होते असें अधिकारी मानल्या गेलेल्या पुरोहितांनी सर्टिफिकेट देणें; दुसरें काय ? असें शिफारसपत्र ह्या विश्वामित्राच्या यज्ञाला वसिष्ठादिकांकडून आणि नंतर ब्राह्मण्य उचलून घरणाऱ्या पुराणकारांकडून वगैरे मिळालें नाहीं एवढाच ह्याचा अर्थ. तें कांहीं असलें तरी त्रिशंकु सदेह स्वर्गगमनाची आतुरतेनें वाट पहात बसला होता. यज्ञ चालला होता. वर्षानुवर्षें लोटलीं तरी त्रिशंकु स्वर्गाच्या आसपास जाईना. ह्या ठिकाणीं खुद्द स्वर्गस्थ देव आणि विश्वामित्र ह्यांच्यांत झालेल्या हमरातुमरीचें आणि ह्या रस्सीखेंचीत त्रिशंकु स्वर्ग आणि पृथ्वी ह्यांच्यामध्यें अधांतरीं लोंबत राहिल्याचें वगैरे जें वर्णन आहे[२०] तें कविकल्पनेचें एक विचित्र विलास म्हणून सोडून देणेंच बरें. जिवंत स्वर्गाला जाणें ही यज्ञानें शक्य होणारी गोष्ट नाहीं हें मात्र विश्वामित्राच्या चांगलेंच लक्षांत आलें. आणि इथेंच त्याच्यामध्यें कांहीं एक वैचारिक क्रांति सुरू झाली. त्यांतूनच शेवटीं प्रतिसृष्टीचें तत्त्वज्ञान निर्माण झालें असें दिसतें.

## प्रतिसृष्टि निर्मितीचा एक नवा अर्थ

नव्या देवांनीं, माणसांनीं राक्षसानीं, गंधर्वांनीं, सर्पांनी आणि नक्षत्रांनीं भरलेली अर्धीमुर्धी सृष्टि विश्वा-

---

१५. स्कंद. ६।५।२४.

१६. रामायण : बालकाण्ड ५८।२२–२४.

१७. स्कंद. ६।६।५.

१८. रामायण : बालकाण्ड ५९।२–५.

१९. क्षत्रियो याजको यस्य चण्डालस्य विशेषतः ।
कथं सदसि भोक्तारो हविस्तस्य सुरर्षयः । – रामायण : बालकाण्ड ५९।१४.

२०. भागवत, हरिवंश, रामायण वगैरे.











मित्रानें खरोखरीच निर्माण केली हीं अर्थातच पुराणांतलीं वांगीं. सत्य निराळें असलें पाहिजे. विल्सननें ह्या प्रतिसृष्टीचा एक अर्थ सुचविला आहे.[२१] विश्वामित्रानें त्रिशंकूच्या मृत्यूनंतर त्याचें एक प्रकारचें स्मारक करण्याचें ठरविलें. एका नक्षत्रालाच त्रिशंकु असें नांव देऊन त्या राजाची कीर्ति अजरामर करायची अशी विश्वामित्राची योजना. वसिष्ठाचा ह्याला स्वाभाविकच विरोध झाला असावा. ह्या साध्या ऐतिहासिक घटनेचा पुढें रामायण, महाभारतांतून वगैरे भलताच विपर्यास केला गेला आणि एक अद्‌भुत कथा निर्माण करण्यांत आली असें विल्सनचें म्हणणें आहे.[२२] प्राचीन कथावाङ्मयांतून सगळ अतिरंजन कमी करून नेमका सत्याचा कण हुडकण्याचा हा विल्सनचा उपक्रम स्तुत्य आहे ह्यांत वाद नाहीं. स्वतः विल्सन आपला अर्थ नम्रपणें एक सूचना (“suggestion”) ह्या स्वरूपांतच मांडतो. विल्सननें आपलें म्हणणें कशावर आधारलें आहे? तर वायु आणि ब्रह्मांड ह्या पुराणांतून पुढली प्रतिसृष्टीची कथा नाहीं, फक्त त्रिशंकु राजा झाला आणि पाठोपाठ तो आकाशांत तेजानें चमकूं लागला असा आटोपता मजकूर आहे, ह्यावर हीं दोन्ही पुराणें प्राचीनतम आहेत आणि म्हणून अधिक विश्वसनीय असाहि तो मुद्दा मांडतो. परंतु ह्यावर थोडा अधिक विचार झाला पाहिजे. अन्य संबंधांत विल्सन म्हणतो कीं, वायु आणि ब्रह्मांड पुराणांच्या संपादनांत आणि पुनर्लेखनांत बरेच खेळ केले गेले आहेत. सत्यव्रताचें दुर्वर्तन मुद्दाम जास्त करून सांगितलेलें आहे आणि त्यामागें वसिष्ठाची निर्दयता न्याय्य ठरविण्याचा खटाटोप ह्या दोन्ही पुराणांतील मजकूर हाताळून केलेला आहे असें विल्सनचें विधान आहे.[२३] आतां हें जर खरें असेल, म्हणजे वायु आणि ब्रह्मांडपुराणें त्यांच्या नंतरच्या स्वरूपांत विश्वामित्र-विरोधी असतील तर तीं आपण सर्वस्वी ग्राह्य कशीं मानायचीं? विश्वामित्राचें महत्त्व वाढूं नये हा हेतु असेल तर त्याच्या यशस्वी उद्योगांचीं तपशीलवार वर्णनें त्या दोन पुराणांतून येणार नाहींत. दुसरें असें कीं मौखिक परंपरेंतून आलेलीं पुराणें आणि महाकाव्यें ह्यांतून जुनें म्हणून अधिक विश्वसनीय असें कांहीं तत्त्व काढणेंहि फारसें बरोबर नाहीं. जुन्या पुराणांत वगळलेल्या गोष्टी नव्या पुराणांतून येऊं शकतील; आणि नव्यांचा आधार असलेली दंतकथा जर अधिक ऐतिहासिक असेल तर नवेंच अधिक विश्वसनीयहि ठरेल. जुन्यांतलीं जुनीं पुराणेंहि तीं सांभाळणारे पुराणिक हवीतशी काटछाट करून किंवा भर

२१. JRAS 1913.

२२. “If one may venture on a conjecture in these conditions, possibly, Vis'vamitra may on Trishanku's death have proposed to do him honour and may have given him celestial dignity by naming a constellation Trishanku after him — a step to which Vasishtha naturally might have objected ... It is obvious that this incident has grown from the simple statement in the ancient verses to the absurd table in the Ramayana” — Ibid p. 903

23. “But the Vayu text shows unmistakable traces and the Brahmanda some traces of having been tampered with, with the result that Satyavrata's misconduct is exaggerated and Vasishtha's severity extenuated...... Vasishtha in an unpleasing light should be toned down ... ... at Satyavrata's expense” — Ibid. p. 889








टाकून बिघडवूं शकतील. म्हणून पुराणमहाकाव्यांतून सत्य शोधून काढतांना हकीकतीच्या प्राचीनतेपेक्षां त्यांतील संभवनीयता आणि सुसूत्रता पाहिली पाहिजे. भविष्यपुराणासारखीं थोतांडें, कीं ज्यांत शिवाजी आणि महाराणी व्हिक्टोरिया ह्यांच्या सुद्धां गोष्टी आहेत, हीं अर्थातच ऐतिहासिक आधार म्हणून जवळजवळ सर्वस्वींच त्याज्य आहेत. परंतु वायु-पुराण आणि रामायण महाकाव्य ह्यांत पहिलें दुसऱ्या-पेक्षां अधिक विश्वसनीय असें म्हणणें तर्कशुद्ध होणार नाहीं. घटनेची संभाव्यता हाच विचार सर्व-प्रथम. अर्थात् कुठल्याहि पुराणांत न आलेली हकी-कतच सर्वांत जास्त संभवनीय वाटण्याचा संभव आहे. पण तसें लिहूं गेलों तर तें इतिहासकथन होणार नाहीं. स्वतंत्र कथालेखनच व्हायचें ! म्हणून पुराण महाकाव्यांतून वर्णिलेल्या घटनांमधूनच जास्तींत जास्त संभवनीय घटना कोणती हें पाहाणें आणि त्या पाठोपाठ तिचा जास्तींत जास्त पटण्यासारखा अर्थ लावणें ह्याच पद्धतीनें कांहीं थोडा इतिहास हातीं लागूं शकेल. — आतां ह्या दिशेनें प्रयत्न करून ह्या प्रतिसृष्टि प्रकरणाचा मूल साहित्यावर आधारलेला एक नवा अर्थ ह्या ठिकाणीं लावावयाचा आहे.

— बारा वर्षें यज्ञकुंडांत किती तूप पेटलें आणि किती समिधा जळल्या ह्याचा हिशेब नाहीं; किती भोजनें झालीं असतील आणि किती दक्षिणांची खैरात झाली असेल ह्याची गणती नाहीं. पण त्रिशं-कूची स्वर्गाच्या दिशेनें तसूभर सुद्धां चाल झाली नाहीं. खुद्द ब्रह्मदेवानेंच म्हणे विश्वामित्राला बजावलें होतें कीं सदेह स्वर्गांत येतां येणार नाहीं : वाटल्यास मरावें आणि यावें ! [२४] विश्वामित्रानें तर सत्यव्रताला सशरीर वर नेण्याचें अभिवचन दिलेलें. ह्या अप-यशानें विश्वामित्र भांब्रावला आणि निराळेंच बोलूं लागला. त्याचा यज्ञावरचा आणि यज्ञफलावरचा विश्वास उडूं लागलेला दिसतो. देवांच्या स्वर्गाचा नवीन अर्थ त्याला प्रतीत होऊं लागतो. स्वर्ग म्हणजे माणसाच्या कल्पनेंतलें विश्व. माणसानें आपल्या समा-धानासाठीं तें निर्माण केलेलें. यज्ञ हें माणसांच्या काम-नापूर्तीचें साधन. मानव्याचा खून करणारी यज्ञसंस्था आपल्याला मंजूर नाहीं. असें त्यानें पुढे शुनःशेपाला बळी देण्याचें प्रसंगीं म्हटलेलें नमूद आहे. [२५] यज्ञाला हा अर्थ त्याला त्रिशंकूसाठीं केलेल्या ह्या निष्फळ यज्ञापासूनच उलगडूं लागला असावा. तुम्ही विशिष्ट देव मानतां, त्यांचें विशिष्ट निवासस्थान मानतां. सगळा मानण्याचाच मामला ना ? मग मी निराळेच देव मानतो. निराळाच स्वर्ग मानतो. ती माझी प्रतिसृष्टीच खरी. त्यांतला इंद्र कुठला तो मी सांगेन किंवा ह्या माझ्या नव्या जगांत इंद्र नसला म्हणून तरी काय बिघडलें ?[२६] असें म्हणून विश्वा-मित्र खरोखरीच नवी सृष्टि घडवूं लागला—म्हणजेच विचारांची, कल्पनांची नवी दुनिया तो त्रिशंकूला दाखवूं लागला. यज्ञानें न मिळणाऱ्या स्वर्गाबद्दलची खंत सोडून दुसरा स्वर्ग पाहाण्याची, अन्य तऱ्हेनें स्वर्गसुख भोगण्याची नवी दृष्टि त्यानें त्रिशंकूला दिली.[२७] ह्या नव्या विचारसृष्टींत निश्चित कायकाय

२४. स्कंद०

२५. देवी भागवत ७।१६।३९–४३.

२६. " अन्यमिंद्रं करिष्यामि लोको वा स्यादनिंद्रकः । रामायण : बाल० ६०।२३.

२७. रामायणावरील अलीकडल्या टीकांतून असें सुचविण्यांत आलें आहे कीं " अन्येन्द्रकं भुवनं " ह्यामध्यें त्रिशंकू हाच इंद्र असा आशय आहे. तूं इंद्र हो, आणि दुसरे देव तुझे तूं मान; स्वर्ग तूं स्वतः निर्माण कर अशा तऱ्हेची नवी जीवनदृष्टि ह्यांत अभिप्रेत आहे.

— रामायणावरील ( १ ) तिलक ( २ ) शिरोमणि, आणि ( ३ ) भूषण —टीका. बालकाण्ड सर्ग ६० [ सं. श्रीनिवासशास्त्री–मुंबई गुजराती प्रिंटिंग प्रेस ]

होतें ह्याचे तपशील उपलब्ध नाहींत; पण तिच्यांत यज्ञसंस्था नाहीं असें मात्र स्पष्ट नमूद झालेलें आहे. त्याच्या ह्या नव्या मतांचा बराच प्रसार होऊं लागलेला असावा. कारण, विश्वामित्राचें हें प्रतिसृष्टि बांधणीचें काम लवकर बंद कर, नाहींतर आपली धडगत नाहीं अशी देवांनीं आणि ऋषींनीहि ब्रह्मदेवास केलेली प्रार्थना[२८] पुराणांतून आली आहे. विश्वामित्रानेंहि ब्रह्मदेवास आपली सृष्टि अक्षय करण्याविषयीं प्रार्थना[२९] केली. ह्याचा अर्थ जुने, वसिष्ठानुयायी आणि नवे, विश्वामित्रानुयायी ह्यांच्यांत आपापल्या मतांच्या आणि भूमिकांचा प्रचार घडाक्यानें चालला होता. आणि शेवटीं ब्रह्मदेवानें जेवढी सृष्टि तोंपर्यंत निर्माण केली होती तेवढी अक्षय होईल असा वर दिला; म्हणजेच विश्वामित्राच्या मतप्रणालीनें मूळ धरलें. तथापि वर देतांना ब्रह्मदेवानें मेख मारली कीं तुझी सृष्टि टिकून राहील, पण तिच्यांत यज्ञ कधींच होणार नाहींत. अर्थ असा कीं, विश्वामित्राची नवी कल्पनासृष्टि, विचारसृष्टि थोडीबहुत लोकप्रिय झाल्यामुळें ब्राह्मणांना तिचें अस्तित्व मान्य करावें लागलें; परंतु ती सृष्टि यज्ञार्ह नाहीं म्हणून निकृष्ट आहे असा जाहीरनामा काढून त्यांनीं आपलें समाधान करून घेतलें ! आपल्या सृष्टींत यज्ञ नाहींत ह्याचें विश्वामित्राला काडीमात्र दुःख झालेलें दिसत नाहीं.[३०]

एवंच प्रतिसृष्टि म्हणजे एक नवें तत्त्वज्ञान, निराळी कल्पनासृष्टि. इंद्रादि देवता आणि त्यांना खूष करण्यासाठीं निर्माण झालेली यज्ञसंस्था ह्यांवर आधारलेल्या जगताहून निराळें विचारविश्व निर्माण करण्याचा एक प्रयत्न. ह्या प्रयत्नांत विश्वामित्राची स्वतंत्र बुद्धि स्पष्ट दिसते. त्याचें धाडस वाखाणण्यासारखें आहे. तथापि स्वतः विश्वामित्र ह्या नव्या प्रणालीला निष्ठेनें आणि नेटानें धरून राहिला असें दिसत नाहीं. पुढील आयुष्यांत विश्वामित्र पुन्हां यज्ञांच्या लफड्यांत अडकतो. ब्राह्मणत्व आणि पौरोहित्य मिळविण्यासाठीं आकांडतांडव करीत असलेला दिसतो. किंबहुना द्विजत्व प्राप्तीसाठीं आरंभिलेल्या तपश्चर्येंत मध्येंच त्रिशंकू प्रकरण उपस्थित होऊन एक मोठें विघ्नच आलें असें मानतांना दिसतो.[३१] इंद्राला धुडकावून लावणाऱ्या विश्वमित्रानें ब्राह्मण होण्यासाठीं एवढा आटापिटा कां करावा ? नव्या सृष्टीची भाषा बोलणाऱ्याला ब्राह्मणत्वाचें आणि पौरोहित्याचें एवढें महत्व कां वाटावें ?

विश्वामित्राच्या जीवनचरित्रांत अशा अनेक अनाकलनीय आणि विसंगत घटना आहेत. विश्वामित्राचें संमिश्र व्यक्तिमत्त्व नीट उलगडल्याखेरीज त्या घटनांचा अर्थ लागणार नाहीं. पुढील प्रकरणांतून त्यांची थोडी थोडी उकल करावयाची आहे

---

२८. स्कंद०; रामायण.

२९. स्कंद० ६।७।९–१८.

३०. कित्ता; रामायण: बालकाण्ड ६०.

३१. रामायण: बालकाण्ड ६१।१-४








डॉ. प्र. चिं. शेजवलकर

# रस्तेवहातुकीची पुनर्रचना

अविकसित देशांच्या आर्थिक नियोजनांत, संन्याशाच्या लग्नाला शेंडीपासून तयारी करावी लागते त्याप्रमाणें, अर्थव्यवस्थेचा कणा किंवा पाया असणाऱ्या वहातुकीच्या साधनांच्या विकासावर जास्त भर द्यावा लागतो. पहिल्या व विद्यमान पंचवार्षिक योजनेंत दळणवळणावर सर्वांत जास्त खर्च करण्याचा संकल्प करण्यांत आला तो याच दृष्टीनें. पण आपल्या देशांतील ग्रामीण अर्थरचनेचें स्वरूप लक्षांत ठेवून वहातुकीच्या कोणकोणत्या साधनांना किती कमी अधिक महत्त्व द्यावयाचें याबाबत मात्र विविध तज्ज्ञलोकांत मतभेद झाले. मूलभूत व पायाभूत उद्योगधंद्यांची लवकर वाढ करण्याच्या दृष्टीनें लोहमार्गाच्या विकासावर भर देणें अनिवार्य आहे असें सरकारला वाटलें व गेल्या कांहीं वर्षांत दळणवळणाच्या बाबीवर संकल्पिलेली रक्कम लोहमार्गाच्या पुनर्व्यवस्थेसाठीं खर्च करण्यावर जास्त भर देण्यांत आला. मात्र ही रक्कम रेल्वेंतील विविध सामुग्रीचें नूतनीकरण करण्यांत आणि नवी सामुग्री, एंजिनें, डबे, वाघिणी वगैरे, तयार करण्यांत खर्च होत गेल्यामुळें देशाच्या नव्या भागांत लोहमार्गाचा विकास फारसा झाला नाहीं. त्याचवेळीं, नियोजनाचाच परिणाम म्हणून वाढत जाणाऱ्या, उत्पादनाच्या व व्यापाऱ्याच्या वाढत्या वहातुकीची जबाबदारी पार पाडण्यांस, उपलब्ध असलेली रेल्वेची सामुग्री अपुरी पडत चालली. साहजिकच वाढती वहातुक रस्त्यांवरून मोटारीनें नेण्याची आवश्यकता उत्पन्न झाली. रेल्वेवर वहातुकीचा इतका ताण पडला कीं कित्येक स्थानकांवर तीन तीन चार चार महिने माल तुंबून पडत असे. कोल्हापूरला चार चार महिने गुळाच्या ढेपी अडकून पडल्याचें उदाहरण श्री. ए. डी. श्रॉफ यांनीं दाखवून दिलें. कित्येक स्थानकांवर माल वहातुक स्वीकारण्याचें काम बेमुदत बंद ठेवण्यांत येत असे. वाघिणींचा तुटवडा निर्माण झाल्यामुळें त्यांतून लांचलुचपत, अक्षम्य दिरंगाई, भाववाढ, माल कुजून पडणें किंवा चोरीस जाणें असेहि प्रकार वाढले. रेल्वेवहातुकीवरील ताण कमी होण्यासाठीं रस्त्यांची पुरेशी वाढ मालमोटारींच्या संख्येंतील वाढ आणि कार्यक्षमतेनें दळणवळण करणाऱ्या मोटारवहातुक संस्था या तिन्ही गोष्टींच्या पद्धतशीर विकासावर सरकारनें भर द्यावा अशी औद्योगिक व व्यापारी क्षेत्रांतून आग्रहाची मागणी सुरू झाली. मोटारवहातुकीमुळें आपला माल, चोरी किंवा नासधूस न होतां, सुरक्षित, रेल्वेनें येणाऱ्या खर्चाच्या निम्म्या खर्चांत आणि रेल्वेनें लागणाऱ्या वेळेच्या निम्म्या वेळेंत येऊन पोहोंचतो हा अनुभव व्यापाऱ्यांना येऊं लागला. रेल्वेवरील ताण कमी होऊन रस्त्यावरील वहातुक पद्धतशीर रीतीनें कशी करतां येईल याची चौकशी करण्यासाठीं सरकारनें लोकसभेचे सदस्य श्री. एम्. आर्. मसानी यांच्या अध्यक्षतेखाली ५ मे १९५८ रोजीं एक समिति नेमली. ग्रामीण अर्थव्यवस्थेचा विकास होण्यासाठीं आणि नियोजनाच्या संदर्भात रस्तेवहातुकीचा विकास, त्याच्या वाढींतील सुसूत्रता आणि त्यावरील नियंत्रण पद्धतशीर रीतीनें होण्याच्या दृष्टीनें प्रत्येक राज्यांत मोटार वहातुकीकडे लक्ष देणारी सरकारी यंत्रणा कशी आहे व त्यांत कोणती सुधारणा व्हावी हें पहाण्यासाठीं ही समिति नेमण्यांत आली होती.



अनुक्रमणिका






२८ मार्च १९५९ रोजीं सरकारला सादर केलेल्या अहवालांत या समितीनें देशांतील रस्त्याच्या वाढीची, रस्तेवहातुकीची आणि त्यावरील सरकारी नियंत्रणाची सध्याची परिस्थिती कशी आहे याचें सखोल विवेचन केलें आहे. रस्तेवहातुकीची स्वातंत्र्य-पूर्वकाळांतील व गेल्या कांहीं वर्षांतील वाढ कशी होत गेली, ती कोणत्या दृष्टीनें अपुरी वाटली व ही वाढ अपुरी रहाण्यास कोणत्या गोष्टी कारणीभूत झाल्या याचें पृथक्करण समितीनें आपल्या अहवालांत बारकाईनें केलें आहे. याचबरोबर मोटारवहातुकीची कार्यक्षम वाढ होण्यासाठीं कोणकोणत्या गोष्टी करा-वयास हव्या, प्रत्येक राज्यांत मोटारवहातुकीची शासनव्यवस्था कशी असावी, परवानापद्धतीचें स्वरूप व नियम कसे असावेत आणि रेल्वे व रस्ते या दोन साधनांच्या वाढीत सुसूत्रता निर्माण करून दळणवळणाच्या दोन्ही साधनांचा जास्तीतजास्त उप-योग कसा करून घेता यावा यासंबंधीच्या शिफारसी अहवालांत विस्तृतपणें आढळतात.

## रस्त्यांची अपुरी वाढ

जवळजवळ १३ लक्ष चौरस मैल क्षेत्र आणि ३८ कोटी लोकसंख्या असणाऱ्या आपल्या देशांत फक्त १,२१,६१७ मैल पक्के रस्ते आणि सुमारें दोन लक्ष मैल कच्चे रस्ते आहेत. या सर्व रस्त्यां-वरून सुमारें सव्वालक्ष मालमोटारी, अर्धा लक्ष उतारूंची वहातुक करणाऱ्या मोटारी, तीन लक्ष इतर मोटारी आणि एक कोटी ओझीं वाहून नेणारे प्राणी वहातुक करीत असतात. रस्त्यांच्या व मोटारींच्या साधनांची ही उपलब्धता इतर कित्येक देशांच्या मानानें अतिशय कमी आहे. उदाहरणार्थ, दर चौरस मैलास आणि दर एक लक्ष वस्तीस रस्त्यांचें प्रमाण भारतांत किती कमी आहे हें खालील कोष्ट-कावरून कळून येईल.

| देश | रस्त्यांची लांबी | |
|---|---|---|
| | दर चौरस मैलास | दर लाख वस्तीस |
| ग्रेटब्रिटन | ३·२४ | ३८४ |
| फ्रान्स | ३·०३ | १५०२ |
| अमेरिका | १·०० | १८३४ |
| स्पेन | ०·३८ | २५१ |
| सिलोन | ०·३८ | ११५ |
| भारत | ०·२५ | ८२ |

भारतांतील आणखी शोचनीय स्थिती अशी कीं वरीलपैकीं साठ टक्के रस्ते सर्व ऋतूंत वापरण्या-सारखे नसतात. याशिवाय कित्येक ठिकाणीं पूल कुचकामी असतात किंवा पूल बांधलेलेच नसतात.

मोटारींची संख्याहि आपल्याकडे किती कमी आहे याची जाणीव खालील कोष्टकावरून येते. भारतांत दर एक हजार माणसांमागें एक मोटार एवढेंसुद्धां प्रमाण पडत नाहीं. याउलट अमेरिकेंत दर तीन माणसांमागें एक मोटार उपलब्ध असते.

| देश | दर लाख वस्तीस असलेली – मोटारींची संख्या |
|---|---|
| अमेरिका | ३७,९९८ |
| कॅनडा | २५,२३६ |
| ऑस्ट्रेलिया | २२,९३९ |
| ग्रेटब्रिटन | ९,५९५ |
| फ्रान्स | ९,०९७ |
| मलाया | १,३८५ |
| सिलोन | ९०३ |
| भारत | ८९ |

मोटारींची संख्या गरजेच्या मानानें अपुरी असल्यामुळें आणि पूर्वीच्या मोटार-परवाना काय-द्यांतील दोषांमुळें फारच कमी मोटारींना परवाना मिळालेला आहे हें लक्षांत घेतल्यास ज्या कंपन्यांना परवाना मिळालेला आहे त्यांचा मोटारवहातुकीचा धंदा भरभराटींत आहे येवढेंच नव्हें तर कायद्याचें उल्लंघन करून मोटारवहातुक करणें आणि काळा-







बाजार व लांचलुचपत करणें या गोष्टींनाहि आज ऊत आला आहे हें नव्यानें सांगावयास नको. परंतु असें असूनहि या भरभराटीचा फायदा कंपनीच्या चालकांना मिळतोच असें नाहीं. या धंद्यांत व्यावसायिक व अन्य शिक्षण न घेतलेले व पुरेसा पैसा नसलेले बरेच लोक आहेत. त्यांच्या अज्ञानामुळें व परिस्थितीमुळें, पोलीसांकडून व इतर अधिकाऱ्यांकडून कित्येकदा त्यांची पिळवणूक होते. परिणामी नुकसान मालवहातुक करणाऱ्या व्यापाऱ्याचें व उतारूचें होतें. कारण वाढत्या वहातुकीच्या मानानें वाहनांची संख्या कमी असल्यानें व त्यांच्यावरील सरकारी नियंत्रण कार्यक्षम नसल्यामुळें मोटारवहातुकीचे दर व्यापाऱ्यांना व उतारूंना परवडण्यापलीकडचे असतात. याकरितां वरपासून खालपर्यंत मोटारवहातुकीच्या शासनव्यवस्थेंत असलेली कमतरता प्रथम काढून टाकावयास हवी. कित्येक राज्यांत रस्तेवहातुकीसाठीं स्वतंत्र खातेंहि नाहीं आणि कित्येक राज्यांत एखादा साधा विभागहि उघडलेला नाहीं ही फार मोठी उणीव आहे. बहुतेक ठिकाणीं रस्त्याचें दळणवळण गृहखात्याच्या कक्षेंत अंतर्भूत केलेलें असतें. कित्येक राज्यांत दळणवळणासाठीं कमिशनराच्या दर्जाचा अधिकारी नेमला आहे. परंतु त्याला इतर कित्येक विषयांचीं कामें बघावीं लागतात आणि मग रस्त्याच्या दळणवळणाकडे लक्ष द्यावयास त्याला पुरेसा वेळ मिळत नाहीं. दळणवळणाच्या प्रश्नांत पारंगत असलेल्या मंडळींची एक स्वतंत्र 'उभारणी' (Transport cadre) कित्येक राज्यांत नाहीं. दळणवळणाकडे लक्ष देणारा अधिकारी बहुधा पोलीसखात्यांतील असतो आणि त्याला दळणवळणाचें प्राथमिक ज्ञानहि नसतें. मोटारवहातुक कायद्याची अंमलबजावणी करणारे व मोटारवहातुकीस परवाने देणारे अधिकारी दळणवळणाच्या क्षेत्रांत पारंगत तर नसतातच परंतु पूर्ण वेळ नेमलेले अधिकारीहि नसतात. कायद्यानें परवाना-अधिकाऱ्यांना परवाना देण्याबाबत अमर्याद सत्ता दिल्यामुळें परवाना मिळण्याबाबत सर्वच ठिकाणीं लांचलुचपत व अन्य दोष आढळतात. या उलट रेल्वेच्या जलवाहतुकीच्या व विमान वहातुकीच्या क्षेत्रांत फार मोठ्या प्रमाणावर व कार्यक्षम अशी नियंत्रणव्यवस्था वरपासून खालपर्यंत निर्माण करण्यांत आलेली आहे.

देशांतील वहातुकव्यवस्था अपुरी आहे अशा तक्रारी आल्यामुळें १९५३ मध्यें नियोजनमंडळानें दळणवळणाचा सविस्तर अभ्यास करण्यासाठीं एक अभ्यासमंडळ नेमलें होतें, रस्त्यांखेरीज वहातुकीच्या इतर साधनांबाबत असें दिसलें कीं त्यांना मिळालेल्या वहातुकीपैकीं नव्वद टक्के वहातुक वाहून नेण्याची त्यांच्यांत क्षमता आहे; याउलट रस्त्याच्या दळणवळणाची वहातुकक्षमता चाळीस टक्क्यापर्यंत विना उपयोग पडून राहिली आहे. पुरेशा लांबीच्या आणि पक्क्या रस्त्यांची उणीव, मोटार दुरुस्तीचा आणि चालविण्याचा येत असलेला फाजील खर्च, करांचें अवास्तव ओझें, मोटारवहातुक धंद्यांतील संघटनेची उणीव, राष्ट्रीयीकरणाची भीति आणि सरकारी धोरणांतील कांहीं प्रतिकूल भाग या विविध कारणांमुळें मोटारवहातुकीची प्रगति खुंटली आहे असें अभ्यासमंडळानें व्यक्त केलें होतें. १९६०–६१ अखेर मालमोटारींची संख्या एक लक्ष साठ हजार पर्यंत न्यावी, मोटारींवरील करांचें ओझें वीस टक्क्यांनीं कमी करावें आणि दळणवळणाचें अखिल भारतीय धोरण आंखून नैसर्गिक किंवा परिस्थितिजन्य कारणांमुळें दुय्यम स्थान असणाऱ्या मोटारवहातुकीसारख्या साधनांना विशेष प्रोत्साहन द्यावें अशी मंडळानें शिफारस केली होती. या गोष्टींचा मसानी समितिनें पुनरुल्लेख केला आहे.

### १९५६ च्या कायद्यांतील वैशिष्ट्यें

मोटारवहातुकीच्या प्रगतींतील अडसर दूर होण्यासाठीं सरकारनें मोटारवहातुक कायद्यांत १९५६ मध्यें पुढील बदल केले :

( १ ) विविध राज्यांतील मोटारवहातुकव्यवस्थेंत सुसूत्रता, विकास आणि पद्धतशीरपणा यावा याकरितां 'आंतरप्रांतीय दळणवळण मंडळा'च्या स्थापनेची सोय केली.

( २ ) परवाने देतांना सहकारी संस्थांना अग्रक्रम देण्याचें आश्वासन अंतर्भूत केलें.

( ३ ) सर्व देशांत रस्तेवहातुकीच्या राष्ट्रीयीकरणाची एकच पद्धत घालून देण्यांत आली.

( ४ ) वेगमर्यादा आणि जास्तींतजास्त माल वाहून नेण्याची मर्यादा वाढविण्यांत आली.

दुरुस्त झालेला कायदा अंमलांत येऊन दोन वर्षें झालीं तरीहि मोटारवहातुकींत कोणतीहि अपेक्षित सुधारणा घडून आल्याचें दिसत नाहीं आणि कायद्यांत संदिग्धताहि फार आहे असें मत समितिनें व्यक्त केलें आहे.

## राष्ट्रीयीकरण

उतारूंच्या मोटार वहातुकीचें राष्ट्रीयीकरण करण्याची प्रवृत्ति विविध राज्यांतून गेल्या दहा वर्षांत वाढत गेली. कित्येक राज्यांत वहातुकीच्या शासनासाठीं केंद्रसरकार, राज्यसरकार आणि जनता यांनी ज्यांत भांडवल गुंतवितां येईल अशा स्वायत्त संस्थाहि स्थापन झाल्या. आज अठरा राज्यांपैकीं ( केंद्रशासित विभाग धरून ), सतरा राज्यांत कमीअधिक प्रमाणांत उतारूंच्या मोटारवहातुकीची सरकारनें स्वतः जबाबदारी घेतली आहे. मुंबई आणि उत्तर प्रदेशांत हें प्रमाण बरेंच व्यापक आहे. हिमाचल प्रदेशांत तर संपूर्ण राष्ट्रीयीकरण झालेलें असून मालवहातुकीचेंहि सरकारीकरण झालेलें आहे, आंध्र, मुंबई आणि भूतपूर्व पेप्सूराज्यांत स्वायत्त संस्था आहेत. बिहार व म्हैसूरमध्यें कार्पोरेशन्स स्थापन व्हावयाच्या आहेत. परंतु बहुसंख्य राज्यांत राष्ट्रीयीकृत वहातुक व्यवस्थेची जबाबदारी केवळ एखाद्या सरकारी खात्याकडे सोपविण्यांत आलेली आहे. एकंदरीनें पहातां रस्त्यावरील वहातुकीच्या अगदी थोड्या भागाचेंच राष्ट्रीयीकरण झालेलें आहे असें म्हणतां येईल. कारण अद्यापहि देशांतील जवळजवळ सर्व मालवहातुक आणि पंचाहत्तर टक्के उतारू वहातुक खाजगी संस्थांकडूनच केली जाते. **याबाबत मसानी समितीचा असा दृष्टिकोन आहे कीं कार्यक्षम व पुरेशा दळणवळणाच्या हितासाठीं अगदीं आवश्यक असेल तेव्हांच राज्यसरकारनें वहातुकीच्या राष्ट्रीयीकरणाचें पाऊल टाकावें.** रस्त्यांवरील वहातुकीच्या विकासास इतका प्रचंड वाव आहे कीं खाजगी क्षेत्रांतील कंपन्यांनीं राष्ट्रीयीकरणाचा बाऊ करूं नये. संपूर्ण मालवहातुकीचें राष्ट्रीयीकरण करणें राज्यसरकारला झेपणें शक्य नाहीं हें खाजगी कंपन्यांनीं ध्यानांत घ्यावें. **मात्र खाजगी कंपन्यांनाहि सुरक्षिततेचें आश्वासन सरकारनें दिल्याखेरीज त्या आपल्या कारभारांत पद्धतशीर वाढ करूं शकणार नाहींत याची दखल राज्यसरकारांनीं घ्यावी. १९७५ पर्यंत मालमोटारवहातुकीचें राष्ट्रीयीकरण करणार नाहीं असें सरकारनें स्पष्टपणें जाहीर केल्यास खाजगी कंपन्यांना आपल्या कार्याचा विकास करण्यांस प्रोत्साहन मिळेल.**

## इतर सोयी आणि सवलती

मोटारवहातुकीस प्रोत्साहन देणें जरूरीचें आहे हें एकदां ठरल्यानंतर वहातुकींत वाढ होण्याच्या दृष्टीनें त्यांना सवलती व सोयी उपलब्ध करून देणें अगत्याचें आहे हें ओघानें येतेंच. मसानी समितीनें याहि दृष्टीनें अनेक महत्वाच्या शिफारसी केल्या आहेत. त्यांतील महत्त्वाच्या पुढीलप्रमाणें आहेत.

( १ ) आधुनिक धर्तीच्या मोटारींना योग्य अशा तऱ्हेचे, पुरेशा रुंदीचे व टिकावू रस्ते वाढविण्याची योजना ताबडतोब अंमलांत आणावी.

( २ ) राष्ट्रीय रस्त्यांवरील वहातुकींतील खंड नष्ट करूं शकणारे एकंदर ११६ पूल ताबडतोब








बांधावयास घेण्यासाठीं आवश्यक त्या प्रकारचें पोलाद परदेशांतून आणण्याची तरतूद करावी.

(३) जास्तीतजास्त माल वाहून नेण्याची मर्यादा अजूनहि वाढवितां आल्यास उपलब्ध मोटारींची वहातुकक्षमता पूर्णांशानें वापरल्यासारखी होईल.

(४) नियोजनमंडळानें मोटारींच्या संख्येंत आणि मोटारींना लागणाऱ्या सुटया भागांच्या उत्पादनांत वेगानें वाढ होण्याच्या प्रश्नाकडे लक्ष द्यावें.

(५) मालट्रक आणि बसेस यांच्यावरील विक्रीकर, चैनीच्या वस्तूंवरील विक्रीकराइतका नसावा. स्थानिक स्वायत्त संस्थांनीं आणि सरकारनें मोटारवहातुकीवर लादलेले कर कमी करण्याचा आटोकाट प्रयत्न व्हावा. डीझेलचा वापर जास्त होणें सद्यःपरिस्थितींत इष्ट असल्यामुळें डीझेलवरील कर अजिबात वाढवूं नये.

(६) कार्यक्षम आणि अर्थक्षम अशाच संस्था स्थापन करण्याची सवलत असावी हें जरी खरें असलें तरी योग्य त्या ठिकाणीं एकच मालट्रक बाळगून असणाऱ्या एकटयादुकटया व्यक्तीलाहि वहातुकीचा परवाना द्यावा.

(७) उतारूंची वहातुक करावयाची असल्यास व्यक्तीजवळ किंवा संस्थेजवळ कमीतकमी पांच बसेस तरी असाव्यात. कारण त्यापेक्षां कमी बसेस असल्यास वहातुकींत नियमीतपणा, कार्यक्षमता व नफा निर्माण होणार नाहीं.

(८) भांडवली खर्चासाठीं दीर्घ मुदतीचें कर्ज देण्याच्या योजना स्टेट बॅंकेनें, स्टेट फिनान्स कार्पोरेशन्सनें आणि खाजगी बॅंकांनीं आखाव्यात व त्यासाठीं त्यांना रिझर्व्ह बॅंकेनेंहि मदत करावी.

(९) ग्रामीण विभागांतील गरजा आणि शहरांतील व्यापार उद्योगधंद्यांतील वाढ लक्षांत घेऊन मोटारवहातुकीचें जास्तीत जास्त परवाने देण्याकडे कल असावा. नजिकच्या काळांतील वहातुकींतील संभाव्य अशी प्रचंड वाढ लक्षांत घेतां, मोटार वहातुकीस उत्तेजन दिल्यामुळें रेल्वेचें नुकसान होईल अशी भीति बाळगण्याचें कारण नाहीं आणि मोटारवहातुकींतील वाढीमुळें रेल्वेचें जरी नुकसान होणार असलें तरी कारखानदारांना व व्यापाऱ्यांना दळणवळणाचें कोणतें साधन कार्यक्षम, स्वस्त व सोईस्कर वाटतें याला महत्त्व दिलेंच पाहिजे. कारण त्यावरच उत्पादनखर्च आणि किंमती अवलंबून असतात.

**शासन व्यवस्था**

(१०) राज्यांतील सध्याची शासनव्यवस्था अपुरी असल्यामुळें तिची पुनर्रचना झाली पाहिजे. रस्ते आणि रस्त्यावरील दळणवळण याकडे लक्ष देण्यासाठीं प्रत्येक राज्यांत एक स्वतंत्र खातें असावें व केवळ त्याकडेच लक्ष देणारा स्वतंत्र मंत्रि असावा. या खात्यांत रस्त्यासंबंधीचे सर्व प्रश्न चीफ इंजिनिअरच्या नियंत्रणाखालीं यावेत आणि वहातुकीचे प्रश्न 'ट्रान्सपोर्ट कमिशनर'च्या कक्षेत यावेत. याच खात्यांत नियोजन, विकास आणि संशोधन यासाठीं स्वतंत्र विभाग स्थापन करून दळणवळणाच्या अर्थशास्त्रांतील तज्ज्ञ विभागप्रमुख म्हणून नेमावा.

(११) राष्ट्रीकृत वहातुकव्यवस्थेसाठीं स्थापन केलेल्या शासनव्यवस्थेंत न्यायालयीन अनुभव असलेल्या व्यक्तीची अध्यक्षपदीं नियुक्ती करावी. शासनव्यवस्था मंडळावर व्यापारी संघटनांचे प्रतिनिधी नेमावेत.

(१२) खाजगी कंपन्या वहातुक कायद्याची अंमलबजावणी कितपत करतात हें पहाण्याचें काम सध्यां वहातुकखात्याबरोबरच पोलीसखातेंहि करतें. पोलीसखात्याचा कंपन्यांना कांहीं वेळां निष्कारण त्रास होतो. हें काम केवळ वहातुकखात्यानें करावें.

(१३) प्रत्येक राज्यांत व्यापारी संघटनांचें प्रतिनिधी असलेलें 'दळणवळण सल्लागार मंडळ' स्थापन करण्यांत यावें. यावर वहातुक कंपन्यांचे प्रतिनिधी आणि विधानसभेचे सदस्यहि नेमलेले असावेत.








### भवितव्य

मसानीसमितीनें केलेल्या शिफारसी दूरगामी परिणाम करणाऱ्या व मोटारवहातुकींत कार्यक्षमता व वाढ निर्माण करणाऱ्या आहेत यांत शंका नाहीं. परंतु अशा शिफारसी पूर्वीहि अनेकदां कित्येक मंडळांनीं केलेल्या आहेत. त्यांची सरकारनें जी वाट लावली ती लक्षांत घेतां या शिफारसी सरकार किती प्रमाणांत अंमलांत आणील याची मोटारकंपन्यांना व व्यापाऱ्यांना शंकाच वाटत आहे. जोपर्यंत रेल्वे-पेक्षां दळणवळणाच्या इतर साधनांवर जास्त लक्ष देणें व त्यावर जास्त खर्च करणें आवश्यक आहे व त्या दृष्टीनें नियोजनांतील दळणवळणावरील जास्त खर्च रस्त्याच्या व मोटारीच्या वहातुकीवर करावयास हवा हें सरकारला अभिप्रेत होत नाहीं व त्या दृष्टीनें सरकारच्या व्यापक धोरणांत जोपर्यंत बदल होत नाहीं तोपर्यंत रस्त्यांच्या व मोटारीच्या वहातुकीची उपेक्षाच होत रहाणार हें उघडच आहे. समितीचे अध्यक्ष आणि कांहीं सभासद अनियंत्रित अर्थ-व्यवस्थेचे कट्टे पुरस्कर्ते असल्यामुळें सरकारी मालकी-च्या रेल्वे वहातुकीपेक्षां खाजगी मोटारवहातुकीला त्यांनीं जास्त महत्व द्यावें व त्यानुसार शिफारसी कराव्यात हें स्वाभाविक आहे अशी अहवालावर टीका झालीच. अर्थात् याचा अर्थ रेल्वेच्या विकासाला यापुढें गौणस्थान दिलें तरी चालेल असें समितीचें जें मत आहे तें, अविकसित देशांतील नियोजनाच्या गरजा काय असतात या दृष्टीनें बघितल्यास, अर्थ-शास्त्राच्या विद्यार्थ्यास मान्य होईलच असें नाहीं.

श्री. द. वें. केतकर

# दुर्गम ओव्या : सुगम अर्थ

## ( १ ) अ. ९ ओ० ४०१ ( राजवाडे )

म्हणौनि अर्जुना एयापरी ।
पाहेचा वेळु नव्हैल भारी ।
हे संन्यासयुक्ति सोपारी ।
दीधली तुज ॥

सुसंगत परिच्छेद व शुद्ध पाठ केला म्हणजे द्वितीय चरण –

पाहे चावळु नव्हैल भारी ।

– असा होतो. याचा कांहींच विचार न करतां या ओवीचा दुसरा चरण आहे तोच स्वीकारून बंकट-दांडेकर वगैरेनीं– (शुद्धाशुद्ध न पाहतांच) – आपापले अर्थ सजविले आहेत. पण ते सारे नीरस, कृत्रिम, आहेत.

अ० १८ ओ० ७४–तेथ प्रत्युत्तरें बोली। श्री कृष्णें जे चावळिली । किंवा–अ० ६ ओ० ११८–ते कवणेंसी मग चावळावी – इत्यादि प्रयोगावरून, चावळणें म्हणजे बोलणें, निवेदन-प्रवचन-उपन्यास करणें, बडबड, शब्दांची खटपट करणें – असा अर्थ गवसतो. अर्थात् चावळु म्हणजे, भाषण, प्रवचन, शब्दांची खटपट, बडबड हा अर्थ स्पष्ट आहे. यावरून द्वितीय चरण – मूळचा असा –

पाहे चावळु नव्हैल भारी ।

– होता, तो लेखकदोषानें भिन्न झाला. आतां मूळ पाठाचा अर्थ करूं. **पूरक शब्दासह अन्वयार्थ** – अग्नि-कुंडांत दग्ध झालेल्या बीजाप्रमाणेंच मदर्पित कर्मेंहि वांझोटी होतात. मग बंधकत्व खुंटतें. त्यायोगें – जन्म-मरण पुसून जातें. तात्पर्य – सर्व कर्में अर्पण करण्यानें तूं कर्मनिर्लिप्त होशील. ( अ० ९ ओ० ४००-४०३ ) हा तुला सहज समजणारा तत्वार्थ आहे. ( म्हणौनि अर्जुना ययापरी ) याप्रमाणें मला केवळ तीनच ओव्यांत स्पष्टपणें सांगतां आल्यावरून ( पाहे ) तुझ्या ध्यानांत सहज येईल कीं – जिच्याविषयीं उपपादन करितांना ( चावळु ) शब्दांची खटपट ( नव्हैल भारी ) दीर्घ करावी लागत नाहीं – अशी ( हे ) ही मदर्पणानें कर्मरहित होण्याची ( सोपारी ) सांगायला सोपी, बुद्धिस्थ होण्याला सोपी, व आचारावयासहि सोपी ( संन्यासयुक्ति ) मदर्पणयुक्ति ( दीधली तुज ) मी तुला दिली आहे. आमच्या मतें वरील ओवीचा असा अर्थ आहे. पदच्छेद तेवढाच निराळा केला आहे. कारण अर्थध्वंसक पदच्छेद राजवाडे-प्रतींत संख्यातीत आहेत.

इतरांचे अर्थ – ही युक्ति तूं एकदम अमलांत आण. ती जर उद्यां अमलांत आणूं-म्हणशील तर तितकाच जास्त वेळ लागणार नाहीं काय ? – हे दांडेकर-बंकट याचे अर्थ पूर्ण बालिश म्हणून विसंगत आहेत. किती ढोबळपणा हा ! !

## ( २ ) अ० १५ ओ० २३६

जैसे घटाचें नाहींपण ।
असतचि असें केलेनवीण ।
तैसा समूळ वृक्षु जाण ।
अनादि हा ॥ २३६
अर्जुना ऐसेनि पाही ।
आद्यंतु ययासि नाहीं ।
माजीं स्थिति आभासे कांहीं ।
परी टवाळ ते गा ॥ २३७

विवरण – ओ० २३६ मध्यें पहिल्या दोन चरणांत " घटाचें नाहींपण । असतचि असे केलेनविण " – असें स्पष्ट सांगून पुढें – ३, ४ चरणांत – " तैसा हा समूळ वृक्ष ( देखील ) अनादि जाण " – असें सांगण्यांत –

अनादि = नाहींपणव्यासत्व

– हाच अर्थ होतो. तसेंच हें " नाहींपणव्यासत्व " देखील –

असतचि असे केलेनविण –

– याच वर्गांत पडणारें आहे हेंहि स्पष्ट होतें. हा सर्व स्पष्टार्थ " तैसा " – या उपमाप्रतिपादक शब्दावरून आपोआपच सिद्ध होतो.



अनुक्रमणिका







प्रस्तुतांत प्रागभाव व प्रध्वंसाभाव यांची विवक्षा नाहीं.

(१) "केलेनविण" या शब्दावरून, "नाहींपण= प्रागभाव" – असा अर्थ केला तर, ओ० २३७ च्या ओवींतील "अन्तु ययासी नाहीं" – या प्रयोगानें "प्रागभाव" निरस्त होतो. कारण प्रागभाव सन्त आहे.

(२) ओ० २३७ तील "अंतु ययासी नाही" यावरून "प्रध्वंसाभाव" विवक्षित आहे असें म्हणावें तर – ओ० २३७ तीलच "आदि ययासी नाहीं" या प्रयोगावरून "प्रध्वंसाभावहि" निरस्त होतो. कारण प्रध्वंसाभाव हा "सादि" आहे.

यावरून

हे दोन्ही अभाव ज्ञानदेवाना अभीप्सित नाहींत हें स्पष्ट आहे.

शिवाय

(३) प्रतियोगिज्ञानानेंच अभावज्ञान होतें, जसें – घटाभावाचा प्रतियोगी घट. घट समोर दिसला कीं त्याचा प्रागभाव व प्रध्वंसाभाव हें द्वैत लागलीच प्रतीत होतें. तें अभाव सांगायला ज्ञानेश्वर नकोत. म्हणून त्यांना त्यांनीं स्पर्शहिं न करतां – सिद्ध घटाच्या त्रैकालिक अभावाचें उद्दिष्ट ज्ञानेश्वरांनीं विवरणाकरितां घेतलें आहे, तें असें —

दृश्य घटाच्या त्रैकालिक अभावाचें उद्दिष्ट विवरण.

ओ० २३७ तील – अर्जुना ऐसेनि पाही। अर्जुना ययासी नाहीं। – यावरून कोणत्याहि संकुचित अभावाची विवक्षा नसून प्रस्तुत स्थलीं – दृश्य घटाचाच –

"त्रैकालिक अभाव व तोहि केलेनविण असणारा" – अभाव विवक्षित आहे-हें प्रयुक्त शब्दावरूनच स्पष्ट दिसतें – तें असें —

**विवेचन** – दृश्य घट समोर पाहून ज्ञानेश्वर म्हणतात — घटाचें नाहींपण। असतचि असे केलेनवीण– म्हणजे या घटाचें नाहींपण पूर्वकालीं होतें, सांप्रतहि आहे व भविष्यकालींहि तें असणार. तें नाहींपण त्रैकालिक व अकृत्रिम आहे.

**प्रश्न** – पहिलें व तिसरें नाहींपण मान्य. पण मधलें नाहींपण, घट प्रत्यक्ष दृश्य असल्यामुळें, मान्य नाहीं. तरी देखील तें मधलें नाहींपण असतचि असे हें कसें ?

**उत्तर** – आदि व अंत नसतांहि मृगजळ मध्येंच भासतें – म्हणजे – आद्यंतु ययासि नाहीं। माजीं स्थिति आभासे कांहीं। अशीच हुबेहूब परिस्थिति घटाची आहे. कारण पूर्वी, मातींत घटाकार नसतो. तसेंच ध्वंसानंतरहि घटाकार नसतो. परंतु मध्येंच कांहीं काळ तो घटाकार भासतो. यालाच अनुलक्षून ज्ञानेश्वर म्हणतात— या मध्यकालांतहि त्या भासमान घटाचें "नाहींपण" केलेनवीण (स्वयंसिद्ध) असतचि असे. कारण कुंभार केवळ घटाकार तयार करतो. तो दुसरें कांहीं तयार करीत नाहीं. तरी देखील त्या घटांत, कोणीहि न केलेलें "क्षणभंगुरत्व" असतचि असे. क्षणभंगुरत्व म्हणजेच "माजींचा आभास" म्हणजेच–"नाहींपण" – तेथें कोणीहि न करतांच घटांत सिद्धच असतें. म्हणूनच—

नाहींपणाचा घटाकार = लटिकेपणाचें प्रतिबिंब.

– हें समीकरण सार्थ आहे. तात्पर्य– दृश्य घट म्हणजे मृगांबु – हें त्रैकालिक सत्य आहे. हा समूळ वृक्षहि तसाच जाण.

## (३) अ० १५ ओ० २४४

देखतां आहे आवडे।
घेऊं जाइजे तरी नातुडे।
जैसा ठीकु कीजे माकडे।
जळामाजीं॥

केवळ अन्वयानेंच या ओवीचा अर्थ पूर्णपणें कळण्यासारखा आहे तो असा —

(प्रतिबिंब) देखतां, जळामाजीं आहे आवडे (म्हणौनि) माकडें ठीकु, (किंवा टीकु) कीजे, (परंतु) घेऊं जाइजे तरी, जैसा (तो प्रतिबिंबित क्षणिक आभास) नातुडे तरी

तैसा – (तंवि, ओवी २४३)

स्वप्नदृष्ट लटिक्याला खरें मानलें तरी त्या क्षणिक कोरड्या आभासाचा जाग्या व्यवहारांत अल्पशः तरी निभाव लागेल कां ? उत्तर – नातुडे.

**वरील अर्थाचीं साधनें** – ठीकु म्हणजे हालचाल. टीक् म्हणजे जाणें, हलणें.– (आपटे) यावरून टीकु= हालचाल, हाच अर्थ होतो. उदाहरण – ग्रहतारागणगती। अंतराळीं ठीकती। परी चालीची रीती। ध्रुवा नाहीं॥ ज्ञाने०॥ म्हणजे ग्रह, तारा, वगैरेंच्या गणांच्या गति अंतराळांत (ठीकती) हालचाल करितात. परंतु ही चालीची रीती ध्रुवाला नाहीं, – ध्रुव हालचाल करीत



अनुक्रमणिका

नाहीं यावरून ठीकु म्हणजे हालचाल हा अर्थ स्पष्ट होतो.

**वंकट-दांडेकर**—यांनीं केलेला वरील ओवीचा अर्थ त्या ओवींतून मुळींच निघत नाहीं. टिकु म्हणजे बोट घालणें हा अर्थ कोठून आला ? आधार काय ? ज्ञानेश्वरीच्या ओवीची प्रौढी घालविणारे अर्थ टिकतील कसे ?

**विनंति**—वरील तीन स्थळांचें विद्वानांनीं परीक्षण करावें.

**ज्ञानेश्वरी अ० १३–१०५**

नीलिमा अंबरीं। कां मृगतृष्णालहरी।
तैसा वायां चि फाउरी। वावो जालें ॥

( यांत नवीन क्रमांक असून यांचाच संदर्भ पुढें दिला गेला आहे ).

( १ ) ओ० १०३, मन तें ऐसें। या संबंधीं विमर्श —

कुकल्प किंवा विकल्प हा तमोगुणावर व संकल्प हा सत्त्वगुणावर राहतो. पण मनाच्या– " संकल्पविकल्पात्मकं मनः " – या स्वरूपामुळें मन हें रजोगुणाचा आश्रय करतें – हें ज्ञानेश्वरांच्या –रजोगुणाच्या खांदीं। तरळत असे। १०४ – या ओवींत सांगितलें आहे.

**ओवी १०४**

( २ ) अ– इंद्रिय– हा एक पदार्थ, ब– विषय– हा दुसरा पदार्थ. (क) इंद्रियविषयसंयोग – हा तिसरा पदार्थ, या तिसऱ्या लब्धीचें अव्यक्त रूप " वाटणें " – कल्पना होणें. या " वाटण्याचें " व्यक्त रूप " मन " होय. या वाटण्याचा आधार मन होय. हें सचेतन मनच चिदधिष्ठित अहंकाराचा एक पैलू होय.

( ३ ) इंद्रियविषयसंयोगाचा व्यक्त जासूद मन. बुद्धीचा मंत्री विवेक. या जासूदाची व मंत्र्याची गांठ पडल्यानंतर बुद्धि निर्णय घेते. म्हणजे बुद्धि व इंद्रियें यांच्यामध्यें विवेकप्रचोदक मन " तरळत " म्हणजे तरंगत असतें. हाच अर्थ – इंद्रियां आणि बुद्धि। माझारिलिये संधीं। रजोगुणाच्या खांदीं। तरळत असे ॥ १०४ ॥ या ओवींत ज्ञानदेवांनीं सांगितला आहे – हें स्पष्ट होईल.

**ओवी १०५**

( ४ ) आतां " वाटणें " याचें रूप करितात – ओ० १०५ – नीलिमा अंबरीं। कां मृगतृष्णालहरी। तैसें वायांची फारारी। वावो जाहले ॥

**अन्वय**

नीलिमा अंबरीं, मृगतृष्णालहरी, तैसें जाहलें वाव, वायांची फारारी ( जाण ).

**लेखकदोष**

वरील अन्वयांत अंतिम – वाव वायांचि फाउरी – हे तीन शब्द पहा. त्यांचा अर्थ – व्यर्थ व्यर्थच फाउरी – याचा कांहींच अर्थ होत नाहीं. वाव हा शब्द ठीक आहे. मग पुनः " वायांचि " हें कशाला ? म्हणजे " वायां चि " हा लेखक दोष उघड होतो.

**दोषनिवारण**

ओ० १०६, १०७, १०८ यांत वायुतत्त्वाचें विभजन, त्याचा आश्रय, व त्याच्या " चांचल्याची " व्यवस्था केली आहे. व ओ० १०९ मध्यें तें विभक्त वायुतत्त्व कोणत्या प्रांतांत वावरतें तें सांगितलें आहे. याचाच अर्थ " वायूची फाउरी " कोठें दमदार होते तें सांगितलें आहे. म्हणजेच ओ० १०५, १०६, १०७, १०८ यांत वायूचा संदर्भ आहे. म्हणून –

" वाव वायांचि फाउरी "

याचें जागीं– ,, वायोची ,,

– असा मूळचा पाठ सिद्ध होतो.

आतां पूरक शब्दासह अन्वय.

( ५ ) नीलिमा अंबरीं, मृगतृष्णालहरी – तैसें ( अशासारखें जें ) जाहलें ( = वाटलें, तें सारें ) वाव ( = निरर्थक अशी ) वायोची फाउरी ( जाणावी ).

वायोची फाउरी = वायूचें तारल्य.

( ६ ) ओ० १०८ मधील चांचल्य तेंच – वायोची फाउरी. हिचें संचारक्षेत्र वर क्रमांक १ मध्यें निवेदिलें आहेच. तरीहि ओ० १०९ मध्यें विस्तारानें पुनः सांगितलें आहे तें असें —

अ – हें चांचल्य विवेकाधिष्ठित बुद्धीच्या "बाहिरी" म्हणजे तिला भेटण्याचें अगोदरच्या जागीं असतें.

ब – " अहंकाराच्या उरावरी " – क्रमांक २ यांतील – इंद्रियविषयजन्यसंपर्क म्हणजे " वाटणें ", " कल्पना होणें " – हें अव्यक्त रूप चिदधिष्ठित अहंकाराला ( मनाला ) पूर्ण व्यापतें – व त्यायोगें – "मला नीलिमा



अनुक्रमणिका







दिसतो " – अशा उद्गाराचें – त्या अव्यक्त वाटण्याला– व्यक्त रूप मिळतें.

**विवरण –**

अव्यक्त, विस्कळित, तरळणारें वाटणें, हें त्या चिद्-धिष्ठित अहंकाराला व्यापून त्याच्याकडूनच " मला नीलिमा दिसतो. मृगांबूचा तरंग दिसतो " – असें वदवितें. याचाच अर्थ तें वाटणें अहंकारावर मात करितें म्हणजेच – तें वाटणें " अहंकाराचिया उरावरी " अधिष्ठित होतें हें ज्ञानेश्वरांचें विधान पटतें, व कौतुकहि वाटतें.

क – ऐसा ठाईं माझारीं। बळियावलें। – याप्रमाणें ( क्र. ३ ) मध्यंतरींच्या ( ठाईं माझारीं ) चिदधिष्ठित मनाच्या ठायीं-स्थानीं – तें वाटणें बळवान् होतें म्हणजे – विवेकाधिष्ठित बुद्धीला पोंचून स्थिर अंतिम निर्णय प्रकट होईपर्यंत तें वाटणें – ती वायूची फरारी बलवती राहते, तरळत राहते.

### आतां ओवी १३–११६९

( १ ) प्रभु काश्मीरीं मूकें। नुपजे जी कवतुकें।
नाहीं उणीं सामुद्रिकें। लक्ष्मीयेसी॥ दांडेकर

( २ ) नाहीं गुणीं सामुद्रिकें। लक्ष्मीयेसी (राज०)

मूकें – लोकांना, आ – हा हा हा – असें म्हणायला न लावणारें तें मूकें. असलें मुकें केशर निपजत नाहीं.

३ रा चरण – सामुद्रिकें = शुभाशुभ लक्षणें – या अर्थाधारें पाहतां– नाहीं उणीं सामुद्रिकें।

– हा पाठ लेखक दोष आहे. सामुद्रिकें याच्या खऱ्या रूढ अर्थाधारें – ( राज० पदच्छेद बदलून ) ना हिंगुणीं सामुद्रिकें। यांतील श्रवणदोष बाजूला काढून– ना हीन-गुणीं सामुद्रिकें। –असा मूळचा पाठ सिद्ध होतो. "हीन-गुणीं " याच्याशीं " मूकें " हें समांतर आहे. म्हणून –

हीनगुणीं किंवा एतत्सदृश पाठ शोधिला पाहिजे. माझ्यापाशीं शोधण्याचीं साधनें नाहींत. मी सुचविलेला पाठ उचित वाटतो. पण आधाराशिवाय बळकटी येत नाहीं. मी सुचविलेल्या पदच्छेदाबद्दल मला पूर्ण खात्री वाटते.* टीप पहा.

ना हीनगुणीं सामुद्रिकें। लक्ष्मीयेसी।

– असा शुद्ध ३ रा चरण सिद्ध होतो. लक्ष्मीला " हीनगुणी " सामुद्रिकें कधींहि लाभणार नाहींत. हें ज्ञानेश्वरांचें ध्येय आहे.

### १ ली ओवी

खनीलिमा मृगांबूर्मिः यदेतत्सर्वमुद्गतम्।
तद्यर्थं केवल ज्ञेयं चांचल्यं वायुवीचिवत्॥
प्रमादात् वाऽपि निर्गन्धं बाल्हीकं नोपजायते।
सामुद्रिकाणां हीनानां लक्ष्मीपाणावसंभवः॥

---

* दांडेकर पाठ – " नाहीं उणीं सामुद्रिकें " – याचा – " शुभाशुभ अशीं दोन्हीं प्रकारचीं लक्षणें – या सामुद्रिक शब्दाच्या खऱ्या अर्थावरून पहातां – लक्ष्मीला शुभाशुभ दोन्हीं लक्षणें कमी नसतात " – असा अर्थ होतो. शुभाबरोबरच अशुभ लक्षणें ही विपुल असणें – हें अश्लाघ्य आहे. म्हणून, दांडेकर पाठ अशुभ. अर्थ-ज्ञानाच्या अभावीं हस्तक्षेपजन्य असा हा पूर्ण कल्पित पाठ आहे. दांडेकर व बंकट या दोन प्रतींत संख्यातीत हस्तक्षेप भेटतात. साखरेप्रतींत त्या मानानें बरेच कमी हस्तक्षेप आहेत. प्रस्तुतस्थळीं राजवाडे पाठ ग्राह्य आहे. इतर पाठ त्याज्य.



अनुक्रमणिका








कु. दुर्गा भागवत

# धर्म आणि लोकसाहित्य : अभिचार किंवा जादुटोणा : ३ :

महाराष्ट्रांत, कोंकणपट्टीपासून ठाणें जिल्ह्यापर्यंत मोठ्या बायांचीं जीं गाणीं प्रसिद्ध आहेत, त्यांतहि देवीचे फोड हीं या बायांचीं म्हणजे सात बहिणींचीं मोत्याचीं लेणींच आहेत असे अनेक उल्लेख आहेत. कुणी या सात बहिणी आहेत असें म्हणतात, कुणी तीन. या समुद्रकांठच्या रहाणाऱ्या असून देशावर फिरायला जातात असे समजहि. नाशिक, सातारा, सोलापूर या बाजूच्या कुणबी, वणजारी, महार, मांग वगैरे लोकांशी चौकशी करतांना मला आढळून आले. यांना गौळणीहि गीतांत म्हणतात. कृष्ण असतोच. त्यांचा भाऊ किंवा प्रियकर आहे याचा मात्र चांगलासा निर्णय होत नाहीं. बायांना बसायला झूले लागतात. देवीला झोपाळा भारतभर आवडलेला दिसतो. चैत्रगौरी झोपाळ्यावरच बसते. मध्यप्रदेशांत जीवरूपी देवतेला बसायला स्मशानांतहि झोपाळे बांधतातच. झोपाळ्याना हिंदूंच्या सांस्कृतिक जीवनांत असाधारण महत्त्व आहे. नागपंचमी, रंगपंचमीचे झूले प्रसिद्धच आहेत.[१] झूला म्हणजे पाळणा असाहि अर्थ होतो. बायकांच्या हातावर पाळणे गोंदलेले भारतभर आढळून येतात. तें देवीचें वाहन समजलें जातें.

## चौलाच्या सात देवता

चौलास सात देवतांची मंदिरें असल्याचें पेशव्यांच्या बखरींतहि नमूद केलेलें आढळतें. या सात देवता (१) चंपावती (२) शीतला (३) एकवीरा (४) पद्मावती (५) कळलागी (६) हिंगुळजा (हीच हिंगळाज किंवा हिंगळाजनी) आणि चतुर्सिंती, अशा आहेत.

यापैकीं चंपावती ही ग्रामदेवता असून चऊळ म्हणजे पूर्वीची चंपावती नगरीच होय. चंपावती किंवा चऊळ हें नदीचेंहि नांव आहे. या सर्व देवतांत हिंगुळजेळाचें फार महत्त्व असून सालोसाल तिची यात्रा भरते. परंतु हिची कथा अशी मिळत नाहीं. हिच्या कुंडांत फुलें टाकलीं तर ती काशीला गंगेंत जातात असा समज आहे. पूर्वी हिच्या कांठीं पिंपळ होता व त्याचीं पानें सोन्याच्या रंगाचीं होतीं. पण त्याचें खोडच काय तें बरेच दिवस शिल्लक राहिलेलें १८७० च्या सुमारास लोकांनीं पाहिलें आहे.

कथा मिळते ती कळलागीची. माझ्या मतें ती मूळची चंपावतीची कथा असून नंतर कळलागीला चिकटली असावी. (कारण कळलागीचें देवस्थान अजून आहे, तसें चंपावतीचें नाहीं.) चौलाला महत्त्व आलें 'चौल-चंपावती' हें नांव सोनचांफ्याच्या झाडांमुळेंच पडलें असें म्हणतात. इथें सोनचांफ्याच्या ज्या झाडाची पूजा करण्यांत येत असे, त्या एकेका फुलाचें वजन बरोबर एक तोळा होत असे असें मेर्सन ड कुन्हानें लिहून ठेवलें आहे.[२]

कळलागीला सोनचांफ्याचीं फुलें फार प्रिय. तिच्या एका श्रीमंत भक्तानें दररोज एक हजार रौप्यमुद्रांची एक माळ तिला घालण्याचें व्रत घेतलें. एकदां

१. झोंपाळ्याला कोंकणी मुसलमानांनीं आपल्या लग्नगीतांत स्थान दिलेलें आढळतें. हा हिंदुसंस्कृतीचाच परिणाम आहे यांत शंका नाहीं.

२. J. Gerson Da Cunha, History and Antiquities of Chaul and Bassein: pp. 108-112.










अनुक्रमणिका

बाजारांत फुलें मिळालीं नाहींत. या झाडावरचें एकच फूल मिळालें, त्याची किंमत हजार रुपये देऊन तें फूल दोऱ्यांत ओवून त्या भक्तानें काळलागीच्या गळयांत माळ घातली. मग काय चमत्कार सांगावा ! जणुं कांहीं हजार रौप्यमुद्रांच्या भारानेंच तिची मान वांकडी झाली. देवी कोपली. तो भक्त तिच्या कोपामुळें निर्धन झाला.

## दक्षिणेंतल्या सात बहिणी

कर्नाटक, तेलंगण व तामिळनाड या प्रांतांत सात बहिणींचें माहात्म्य आहे इतकें कुठेंच नसेल, त्याच सात बहिणींच्या कल्पनेचा रिघाव मध्यप्रदेशांत झाला असला पाहिजे आणि स्थानिक परंपरेमुळें पर्याय निर्माण झाले असावेत असें मला वाटतें. या सात बहिणी फार तामसी, रक्तलोलुप व रोगांच्या अधिष्ठात्या देवता आहेत. बिशप व्हाइटहेडनीं दिलेली त्यांच्या बद्दलची माहिती उद्बोधक आहे, ती अशी.[३]

दक्षिणेंत मरी किंवा शीतला ही सात बहिणींत सर्वांत मोठी समजली जाते. ही देवीच्या रोगाची आणि महामारीची देवता. त्याचप्रमाणें सांथीच्या रोगांची अधिष्ठात्री तीच. तिच्या उत्पत्तीची कथा पुढील प्रमाणें आहे. नागावल्ली ही पिन्हु ऋषीची पत्नी. हिच्या सौंदर्याची व पातिव्रत्याची मोठी ख्याति होती. एकदां ऋषि बाहेर गेले असतांना त्रिमूर्ती ( दत्तात्रय ) तिला भेटायला आले. ती खरोखरच पतिव्रता व रूपवान आहे कीं नाहीं हें त्यांना पहायचें होतें. हे तीन तरुण देव आल्यावर तिनें त्यांचें लहान मुलांत रूपांतर केलें. त्या देवांना राग आला. त्यांनीं तिला शापलें. तिचें रूप गेलें, आणि देवीच्या फोडांनीं तिचा चेहरा विद्रूप झाला. पिन्हू घरीं आला. तिच्या शीलाबद्दल त्याला संशय आला. त्यानें तिला घराबाहेर घालवून दिलें आणि "तूं राक्षसी होशील आणि रोग जगभर पसरवशील असा शाप दिला." तिच्या रूपांत झालेला बदल पाहून पिन्हूनें तिचें नांव मरी ( म्हणजे फरक किंवा बदल ) असें ठेवलें.[४] तेव्हांपासून देवींनीं माणसाचें रूप पार पालटून जातें.

मरीची दुसरी कथा अशी कीं, ती एका शुचिर्भूत ब्राह्मणाची मुलगी होती. एका पारियानें वेदपठन केलें व ब्राह्मणाचें सोंग घेऊन तिच्याशीं लग्न लावलें. पण पुढें त्याच्या कांहीं अब्राह्मण आचारांवरून तिला तो अतिशूद्र असल्याचें कळून आलें. तिनें पतीचा वध केला व स्वतः अग्निकुंडांत उडी घेतली. तिचीच मरीदेवी झाली. मरीमातेला रेडा बळि लागतो याचें कारण रेडा तिच्या पतीचें प्रतीक आहे.[५]

---

३. Henry whitehead, *The village Deities of South India*, pp 111 ff.

४. या कथेंत अनसूया व अहल्या या दोन कथांचें विचित्र मिश्रण झालेलें आढळतें.

५. दक्षिणेंत मरी किंवा शीतला ही देवी व महामारी या दोन्ही रोगांची देवता समजली जाते. परंतु जसें उत्तरेकडे जावें तसें शीतला ( सौम्य स्वरूपी ) ही देवींची अधिष्ठात्री व मरी ही महामारीची देवता असें साधारणपणें समजलें जातें. शीतलेचें महत्त्व उत्तरेंत अधिक आहे. शीतला हिंस्र नसून सौम्य व तारक आहे. बालकांना अभय देणारी आहे. जल तिला प्रिय आहे. इतकेंच काय पण बालकें तिला फार आवडतात आणि त्यांचें ती रक्षण करते असेंहि समजलें जातें. गंगातटीं तिच्या बद्दलची कहाणी मिळते ती अशीः एका मुसलमान मुलीला आपण हिंदु व्हावें असें वाटलें; देवानें तिला दुसरा जन्म शीतलेचा दिला. ( Crooke, Folklore in Northern India I, pp. 125 ff ). शीतलापूजा ही उत्तरेकडून दक्षिणेकडे आली असावी, आणि नंतर दक्षिणेकडच्या ग्रामदेवतांशी संलग्न झाली असावी. शीतलेला, पाणी, फुलें व फळें अशा सुंदर व थंड वस्तु दिल्या जातात. तर मरीला पशुबलि लागतो. शीतला ही मरीहून बरीच अर्वाचीन देवता दिसते.

## तेलंगणांतल्या सात बहिणी

सात बहिणींचें देवतायतन किती ढिलें व लवचिक आहे, त्यांतल्या देवतांचीं नांवें एकाच प्रांतांत स्थानपरत्वें किती भिन्न असतात याचें उत्कृष्ट उदाहरण तेलंगणांतल्या सात बहिणींचें आहे. व्हाइटहेडनें त्यांची नामावली :

—(१) पेदम्मा (२) इसोंदम्मा (३) मरेअम्मा (४) अंकलम्मा (५) एल्लम्मा (६) नकुलम्मा व (७) अरिकम्मा अशी दिली आहे. तर एलमोरनें नेल्लूर जिल्ह्यांतल्या सात बहिणीचीं नांवें पुढीलप्रमाणें दिलीं आहेत. (१) पोलेरम्मा (२) अंकम्मा (३) मुथिलम्मा (४) दिल्लि पोलासी (५) बंगारम्मा (६) मायम्मा (७) रेणुका या देवतांपैकीं पोलेरम्मा ही तामीळनाडमधल्या मरीचीच प्रतिमा आहे. ती देवींची देवता आहे.

या साऱ्या देवतांपैकीं रेणुकेची कथा एलमोरनें दिली आहे. ती अशी :—

एका राजाला मूल नव्हतें. पार्वतीला त्याची दया आली. तिनें मुलीचें रूप घेतलें व वारुळांत लपून राहिली. राजाच्या स्वप्नांत येऊन हें सत्य तिनें सांगितलें. राजा त्या वारुळाजवळ गेला. तिथें रांगोळी घातलेली असून एक दिवा लावलेला होता. राजानें वारुळांतली ती मुलगी बाहेर काढली. तिचें नांव रेणुका ठेवलें.

पुढें रेणुकेचा बाप धंदागिरी याचें राक्षसांशी युद्ध सुरू झालें. त्यावेळीं तिचें जमदग्नीशीं लग्न झालें होतें. रेणुका ही शक्तिदेवी असल्यामुळें तिनें राक्षसांचें दलन करण्याचा बेत केला. 'पित्याच्या मदतीला युद्धांत जाऊं कां ?' म्हणून सासूला पुसलें. मग सासूनें 'हो' म्हणतांच तिनें भाताचीं सात मडकीं डोक्यावर घेऊन प्रवासाला सुरुवात केली. रेणुकेच्या पातिव्रत्यामुळें विस्तवाशिवाय त्या भांड्यांतले तांदूळ शिजत असत. रेणुकेला रस्त्यांत एक मूल दिसलें. त्याच्याकडे पाहून ती हंसली. पण तें पाहून बरोबर असलेल्या पतीला तिच्या शीलाचा संशय आला. त्यानें परशुरामाला तिचा 'वध कर' म्हणून सांगितलें. परशुरामानें तिचें शिर तोडलें आणि मग रेणुकेनें आपलें भयंकर शक्तिस्वरूप पतीला दाखवलें. तें पाहून पतीनेंहि तिला युद्धांत भाग घ्यायला संमति दिली.[७]

अर्थात् या कथेवरून मृत रेणुकेचें अमर्त्यस्वरूप म्हणजेच शक्ति रेणुका.

परंतु माडिगा लोकांत एल्लम्मा हीच रेणुका समजतात. ही शक्ति जगदुत्पत्तीच्या वेळीं पहिल्यानें उत्पन्न झाली. परशुरामाच्या परशूचा प्रहार टाळण्यासाठीं रेणुकेनें माडिगांचा आश्रय केला. परशुराम आला तेव्हां त्यांनी तिला त्याच्या हवालीं करण्याचें साफ नाकबूल केलें. तिचें एल्लम्मा असें नवें नांव त्यांनी ठेवलें.[८]

## पोलेरम्मा

पोलेरम्माच्या आख्यायिकांपैकीं पुढील विशेष प्रसिद्ध आहे. वेरा कुलिल राजु नांवाचा एक भिक्षुक

६. Elmore, *Dravidian Gods in Modern Hinduism*, p. 8.
७. Elmore, op. cit. p. 82–92.
८. Elmore, op. cit. p. 102.

— महाराष्ट्रांत रेणुकेचें एकवीरेशीं साम्य दाखवलें आहे. ती चौसष्ट योगिनीपैकीं एक आहे हें अंबाबाईच्या आरतींत दाखवलें आहे, "तृतीयेचे दिवशीं मिळती चौसष्ट योगिनी हो। सकलांमध्ये श्रेष्ठ, सर्वांमध्ये श्रेष्ठ, परशुरामाची जननी हो। उदो बोला उदो अंबाबाई माऊली हो ॥" निमार जिल्ह्यांत रेणुका अथवा राणुबाई ही सूर्यसंलग्न देवता ग्रामदेवतांपैकीं एक आहे. हिलाच कुणी शीतला म्हणतात. ती मुख्यत्वें बालकांचें स्वास्थ्य रक्षण करते. स्त्रियांचें वांझपण घालवते. हिलाच कुणी षष्ठी माता म्हणतात.

— डॉ. केतकर प्राचीन महाराष्ट्र पृ. २९१.

होता. तो ब्राह्मण पोलेरम्माचा भक्त होता. त्याला सहा मुलगे होते. सातवा मुलगा जेव्हां मातेच्या गर्भात आला, त्यावेळीं योनिमार्गे जन्म पावण्याचा मार्ग त्याला किळसवाणा वाटला आणि त्यानें मातेच्या पाठींतून जन्म घेतला आणि जन्मतःच तो एका कोहळ्यांत लपून बसला. तो कोहळा वेलीवर वाढतच होता. एकदां तो वेलीवरून तुटला व मातेच्या पायांशीं घरंगळत आला. तिनें तो फोडला तों आंतून तिचा हरवलेला मुलगा बाहेर पडला. त्याबरोबर घर सोन्याचें झालें. पण पित्यानें त्याला ओळखलें नाहीं. आईनें त्याच नांव पट्टडी रुद्र ठेवलें.

पुढें त्या गांवचा राजा निपुत्रिक मेला, तेव्हा हत्तीच्या सोंडेंत माळ देऊन राजाची निवड लोकांनीं करायचें ठरवलें. हत्तीनें या मुलाला माळ घातली. त्यानें या सात बहिणींची पूजा बंद केली आणि पोलेरम्माला खड्यांत टाकून दिलें. पोलेरम्मानें, माथम्मा व आपला भाऊ किंवा पति पोट्टु राझु (हा वेताळाचा धाकटा भाऊ समजतात) याला बोलावलें. त्यांनीं आणखी तीनशें साठ देवतांना बोलावलें.

राजाला गळवें झालीं. तो मृत्युशय्येवर पडला. मातेला चिंता उत्पन्न झाली. तिनें देवींची पूजा पुन्हा सुरू कर म्हणून सांगितलें पण तें त्यानें मानलें नाहीं. अखेर आईनें माथम्माची पूजा केली तेव्हां माथम्मानें सांगितलें कीं, मुख्य मंत्र्याचे दांतांच्या कवडयांत, त्याच्या बरकड्यांचे काठ्यांत, त्याच्या पोटाच गोल भांड्यांत किंवा भोंपळयांत, त्याच्या नसांचे तारांत रूपांतर केलें तरच राजा बरा होईल. पण राजानें हें करायला संमति दिली नाहीं.

मग पोट्टु राझु गांवांत शिरून त्यानें रोगांचा कहर उडवून दिला. गुरें, ढोरें, माणसें तडफडून मरूं लागलीं. त्यावेळीं राजा घाबरला व प्रजेचा संहार थांबवण्यासाठीं त्यानें प्रधानाला मारून त्याच्या अवयवांचा कवडया, काठया, भोंपळा व तारांत रूपांतर करून त्याच वाद्य केलें. त्याच्या संगीतानें देवी संतुष्ट झाल्या. हें वाद्य म्हणजेच सतार (किंवा वीणा), भोपळा असलेल्या तंतुवाद्यांची उत्पत्ति ही अशी आहे.[९]

### म्हैसुरांतल्या सात बहिणी

म्हैसुरांत या सात बहिणींना 'मरीभगिनी' म्हणतात. त्यांचीं नांवें पुढीलप्रमाणें आहेत :

(१) बिसलमरी (तापाची देवता), (२) गुर्रल मरी (दम्याची देवता), (३) केलमरी (मातीच्या भांड्याची देवता), (४) हिरि देवता (सर्वांत मोठी बहीण असा हिरीचा अर्थ आहे), (५) सरगेरे मरी (६) चामुंडीश्वरी (७) उत्तनहळ्ळी. पोटराजु हा त्यांचा भाऊ किंवा नवरा.

### कोइंबतुरांतील सात बहिणी

या पार्वतीपासून निघाल्या असें समजतात. त्यांचीं नांवें अशीं : (१) सेनाकटची अम्मन् किंवा पिडारी, (२) कोली अम्मन्, (३) उलकिरनी अम्मन्, (४) अकारि अम्मन्, (५) वंछी अम्मन् (६) सेल्ली अम्मन् (७) कुंथन अम्मन्. त्यांचा भाऊ ऐनार.

याप्रमाणें रोगप्रतिबंधक दैवी व वैद्यकीय उपाय, देवीसंप्रदाय दंतकथा आणि तोडगे यांचा विचित्र समन्वय झालेला आढळून येतो. मला मध्यप्रदेशांत महामारीचा एकच मंत्र मिळाला आहे तो असा :—

आगिनके घागा। पवनका हूनी। इंद्रलोकमें जलनका वासा। न धरती न पिरथी। अधरखंडमें तोर झुलना है। जनमन हो गई राजा मरादेव। तेखर पाछु संवरामरादेव जेखर पाछु देशाईमाता पैदा हुइस। तिनो लोक जो है। चांद सूरज जब हो। सब देवता क्या चरित प्रिथ्वीलोकमें हो गइस। आग जलनेके जल पनिहासा वो बंद हो गइस। ब्रह्मानी

९. Elmore, op. cit, pp. 103-6.








वेद विचारिन रास्ता नही पायिन[10] । ओखर पुरान-पत्रा बालक रोवत है । क्या चरित प्रिथ्वीलोकमें हो गइस । चांद सूरज अलोप हो गइन । गोमाता चारा पानी छोड देइन । पाताललोकमें रमापानी[11] जो है । वेद विचारिस जलने की बेटा परमेसुर अंग है । ऊन आद धंट परमेसर ओला नाव धारिन । भाई राजा चंदेला राजा चउहान[12] मरादेव सँवरा मरादेव छीटें बहिनी जब से बनाथे भाई तब से बन जाही । चोरी फुंदरीके रोजगार दे भैय्या । जा तोला भगवान देइन बहिनी बावनगढके तीन लोके ठापरा इन पेट नहीं भरिस । भाईखर फिर आइस । मोर पेट नहीं भरिस । रोजगारा कहिस । सोनेके खापर तोला देहू खानेखर । हीरा पांच छुटकी तोला देहू । चने फुटानेके रोजगार करवे ते मोर हाव धरिते भाई । अवलके धिमरिन[13] कहावे ते बिलादा मोर बाटा देव भैया । साते गढ देहू सात अजनीया सात बजनीया तोर संग में देहू । ओके बह्मर कोको बह्मर उधर झोकी संखलिकी बेटी लंका दादिनी द्रुपदी तै खावे.

( आगीचा धागा, पवनाचा खांब, इंद्राच्या राज्यांत ज्वाळा, आकाशांत नाहीं. पृथ्वीवर नाहीं, अधांतरी तुझा पाळणा, राजा मरादेव जन्मला. त्यानंतर संवरामरादेव, त्याच्यामागून देशाईमाता जन्मली. तिन्ही लोक, चंद्र, सूर्य सारे देव विचारूं लागले, 'पृथ्वीलोकांत काय घडलें'? अग्नि भडकला आहे. पाण्याचा प्रवाह थांबला आहे. ब्रह्मदेवानें वेदांत पाहिलें. त्याला उपाय सांपडेना. त्याचें कमलपत्र. त्याच्यावर एक बालक खेळतें आहे. पृथ्वीवर काय झालें? सूर्य, चंद्र गुप्त झाले. घाटावर पाणी आणायला गेलेल्या बायका तिथेंच पाण्यांत बुडाल्या. गोमातेनें चारापाणी वर्ज्य केलें. पाताळांत रयपाणीनें वेदांत पाहिलें. बालक परमेश्वर. त्याचें शरीर तापानें गरम झालें. अर्धा तास परमेश्वर राजा झाला. बावीस गढांत त्यानें राजे स्थापले. त्यानां त्यानें अशीं नांवें दिलीं. भय्या चंदेला, राजा चौहान, राजा मरादेव, संवरा मरादेव. सर्वांत धाकटी बहीण भावांबरखीच जन्मली होती. ( ती म्हणाली ) भावानों मला चोळी व लुगडें द्या. ( ते म्हणाले ) जा आम्ही तुला बावन गढ दिले." तिचें पोट भरलें नाहीं. ती भावांकडे परत आली. "माझें पोट भरलें नाहीं." "आम्ही तुला पांच आंगठ्या हिऱ्याच्या आणि सोन्याच्या देतो." "भावानों मला नांव द्या." "तुला धिवरीण म्हणतील." "मी कुठें राहू सांगा भावानों." "तुला सात गढ, सात डफ वाजवणारे, सात वाद्यें वाजवणारे गाणारे देतों, ओको बह्मर, कोको बह्मर, आकाशांत चालणारी, सांखळीची कन्या, लंका जाळणारी द्रुपदी[14] तुला म्हणतील.

१०. ब्रह्मदेवालाहि त्याच्या उत्पत्तिकार्यांत मरादेवानें व इतरांनी उपद्रव केला तेव्हा संभ्रम उत्पन्न झाला.

११. रयपानी कोण आहे तें निश्चित सांगतां येत नाहीं. तो पातालनिवासी असून जादूंत प्रवीण असून ब्रह्मदेवाला सृष्टिरचनेंत अडथळा आणीत असावा असें वाटतें. म्हणून ब्रह्मदेवानें मरादेवाला राजा केलें, व आपल्या कार्यांत त्यानें विघ्न आणूं नये अशी तजवीज केली. रयपाणीचा वंशज मरादेव असावा.

१२. चंदेला व चउहान हे रजपूत राजे.

१३. कोळीण.

१४. द्रौपदीची पूजा दक्षिणेंत तामिळनाडमध्यें प्रचलित असून, पिडारी व द्रौपदी एकच म्हणतात. ( whitehead, op. Cit. p. 113 ) कोचीनमध्यें वेलन या जातींत तिला पांचाली म्हणतात. तिचा संबंध स्त्रियांच्या रजःस्रावाशीं जोडला जातो. ( Iyer, Cochin, *Tribe and Caste*, I, p. 157. )








### भूत बांधणें

वरील देवतांखेरीज सान्या इडापिडा भुतें निर्माण करतात असा समज सर्वत्र असल्यानें भूत बांधण्याच्या क्रियेला खेडोपाडीं मोठें महत्व आलें आहे. मेलेलें मनुष्य भूत होऊं नये म्हणून वास्तविक मर्तिकाच्या वेळींच एका जागीं त्याला मंत्रसामर्थ्यानें बांधून टाकतात. ही जागा एकादें ठराविक ठिकाण किंवा झाड असतें. ही जागा किंवा झाड भुतानें झडपलेलें आहे, हें एकाद्या माणसाला त्याची पीडा झाल्याखेरीज किंवा तें दिसल्याखेरीज, मांत्रिकाच्या साहाय्यावांचून उमगत नाहीं. एकदां तें ठिकाण उमगलें कीं त्या ठिकाणीं भुतासाठीं भात, कोंबडें वगैरे बलि उपद्रव झाल्यावर ठेवतात.

भूत बांधण्याचे दोन मंत्र मला मध्यप्रदेशांत मिळाले ते असे :–

( १ ) पवनके पूत । बीर हनुमत बीर । बारंधू सज्जे । भूत बांधके साज चघे हो[१५] । पिछूके बेर ।

( वायूचा पुत्र; वीर हनुमान, बावन शस्त्रांनिशी सज्ज आहे. भूत बांधल्यावर साजाच्या झाडावर चढतें. पूर्वीचें वैर साजाच्या झाडावरच राहिलें आहे.)

खालील मंत्र स्मशानांत अंत्येष्टीच्या वेळी मृताचा आत्मा बांधण्यासाठीं वापरतात.

( २ ) आमा ढेर धरती फेर । वनखंडमें कामघामें[१६] चले । छुरिरि मुकुटपार आगिन मुरदा जले । राख रतियादेव दैतकू चले । कांजनका पूत हनुमान का बीर । असी लाख पीर पैंगुम सहेलकु पहूंचे । बलकुम्ब पहुचे गरुनारसिंग[१७] । तूं जागती रहे । भूतमसान सब भाग जाव । सहेल मसानका लोहाके सांखर । तीन रातकी भवाकी मारकुट घेरघार संभालनी तूं जागती रहे ।

( आंब्याचा बुंध, पृथ्वीला प्रदक्षिणा, वनखंडांत काम चालू आहे. राख दैत्य रतियादेव राक्षसाकडे जाते. कंजनचा पुत्र. हनुमानाची शक्ति, ऐशी लाख पीर पैगंबराकडे जातात. बलकुमकडे गुरुनारसिंग तूं पोंच. जागती रहा, सर्व भूतपिशाचानों चालते व्हा. स्मशानांतले सांखळदंड लोखंडाचे आहेत. हे भवानी, तीन रात्र जागती रहा. रक्षणकर्ती जागी रहा. )

### समारोप

मध्य प्रदेशांतल्या आणि इतर प्रांतांतल्या रोगदेवतांचें व तोडग्याचें जें विश्लेषण केलें त्यावरून एक गोष्ट माझ्या मनावर प्रामुख्यानें ठसली, ती अशी:- व्याधि दोन प्रकारची आहे. आजार व लैंगिक आपत्ति. या दोन्ही प्रकारांत विशेषतः दुसऱ्या, देवता मानलेल्या पतिपत्नींतला संघर्ष हें एक मोठें कारण आहे. मरीच्या व सात बहिणींच्या कथांत नवरा बायकोचें वैर उघडच दिसून येतें. रजःस्राव ही स्त्रियांच्या वांट्याला आलेली एक अनिवार्य व्याधीच आहे. रजःस्रावाचें भय जगभर पसरलेलें आहे.

---

मध्यभारतांत ग्रामदेवतायतनांत तिचा अंतर्भाव होतो ( Crooke, Folk-lore in Northern India ). ओको बह्यर; कोको बह्यर व सांखळी या देवता असाव्यात असें वाटतें, पण त्यांची माहिती मिळत नाहीं. या तोडग्यांत द्रौपदी व देशाई एकच आहेत असें वाटतें.

१५. ओंडांत साजाच्या झाडाला फार महत्व आहे, त्यांचा बुढादेव साजावरच रहातो. जेव्हां भूत बांधलें जातें तेव्हां त्याला साजावर जाऊन बसण्याखेरीज गत्यंतर नसतें. मृतांचे आत्मे पुनर्जन्म होईतोंवर साजाच्या झाडावरच बसून रहातात.

१६. भूत आंब्यावर रहातें व पृथ्वीवर भटकतें, आणि त्याची पीडा देण्याची कामगिरी वनांतच रंगरूप घेत असते.

१७. गुरुनारसिंग ही एक देवता आहे. पुरुषवाचक नांव हें तिचें वैशिष्ट्य. रतियादेव व कंजन यांची माहिती मिळत नाहीं.



अनुक्रमणिका

पार्वतीच्या वांट्याला पतीची आज्ञा न पाळतां सात समुदरियांना खेळतांना पाहिलें म्हणून आलें. त्या नंतर एक छोटासा संग्राम त्या नवरा-बायकोंत झाला. पार्वतीनें घाबरून शंकराला बोलावलें. तो आला नाहीं. तेव्हां तिनें मातीचा वाघ करून त्यांत जीव भरून तो शंकरावर सोडला. त्या वाघाला पिटाळ-ण्यासाठीं शंकरानें कुत्रे त्याच्या अंगावर सोडले. अर्थात् हा संघर्ष फार तीव्र नाहीं. ओरिसांतल्या खोडांत अशी कथा आहे कीं, बडा पेनु, सूर्यदेव व त्याची बायको तरी, पृथ्वी यांच्यांत एकदां भयंकर झगडा झाला. नवऱ्यानें तरीला शिक्षा केली, कारण पतीची पाठ खाजवण्याचें साधें काम देखील करा-यला ती नाखूष होती. त्यामुळें तरीला रजःस्राव सुरू झाला. तेव्हांपासून वेदनामय बाळंतपण स्त्रीजातीच्या वांट्यास आलें.

### परिशिष्ट १

### लिंगोचें गीत

मल्लुजंडी वेसाड दादी
टेहरा टोकरा मोंगरा रोय
हाची तोकार कुपार
श्याम उसे राउर
देवामुकु हार्रं दादी
मिनुकाटा सिंगार दादी
राउर ताळे पांडे
दुलास्ता पोरो डे दादी
पांडरी कोको लिंगो
लिंगो गोरिल आता
निके जोहार लागे
मिंडा ते कुडुरकम्
नेडे ते जिलाम दादी
लिंगो कालदु पैंजेना
टोडी ते टेंडूने
केवीते वेसोड लिंगो

— हें लिंगोच्या काल्पनिक मंदिरांचें वर्णन आहे.

[मोराच्या पिसांचें छप्पर घातलेलें. टेहरा पक्ष्या-च्या शेपटीचीं पांखें केलेलीं. हाची (गायीच्या पाठीवर बसतो तो पक्षी) पक्ष्याच्या शेंपटाचे पन्हळ केलेले आहेत बरें कां आजी. चारी बाजूंनीं दर-वाजे आहेत. मास्यांच्या खवल्याच्या भिंती आहेत. आंत सुंदर कांबळयाचा बिछाना आहे. असें हें मंदिर आहे आजी. या राउळांत पांडरी कोको, (बुढ्यादेवाचा धाकटा भाऊ) ऊर्फ लिंगो उतरला आहे. त्याच्या हातांत मंजुळ शब्द करणारी वीणा आहे. कमरेला घुंगुर. पायांत पैंजण आहेत. तोंडानें तो बांसरी वाजवतो आहे. त्याच्या कानांतूनहि संगीत निघतें. चहूंकडे हा नाद घुमतो आहे.]

### परिशिष्ट २

### गोंदतांना म्हणायचीं गोंडी गीतें

१

नवा चवेरी बाई काहिलवी
गंगान घोरो नवा चवेरी
सेंडार बाई निकुन ये सेंडार बाई
नवा चवेरी ये मुरियाबाबा

(सुईनें जखम करून काजळानें नव्या आकृति काढल्या, बाई ग, गंगेच्या प्रमाणें पवित्र अशा सेंडारबाई तुला गोंदत आहेत. हे मुरियादेवा नव्या आकृति गोंदत आहेत.)

२

अरसी ताना तरसी
हाय नावा नोनी नडी नोइलाता
ए वारी संगो अरघो रातना पिंगा फेरा हिलेमाय
हिलेमाय नरका मुसुर मुसुर अणदी
बारी माय अरघो रातने अडदी
बारी माय अरघो रातने मेला दे
मिचो वीरीनिकुन
मिरचासे पानी भरे
कार डाले लतिया
कांवाले दल गिताडार
घुंगरू जे बोले

(इडा पीडा निघून जावो. अग मुली हाय हाय करून रडूं नको. इकडे ये. मी तुझ्याजवळ अर्धी रात्र बसून आहे. रडूं नको, मुसमुसून रडूं नको. इकडे ये. अर्ध्या रात्रीं सुई चालली आहे, अर्धी रात्र पुरी होऊं दे. विंचू डसावा तशी वेदना होते. मिरची मुळेच जणुं कांहीं पाणी सुटतें, चुरचुर लागते. लाल राम निघालें. कावळा बसल्यावर डहाळी हलते, तशी हलू नको. देव बोलतो आहे.

आमाके झाडमें कौं बैठे मेया
चंदन छबिला बगानिलाची
पिपरका झाडमें कौ बैठे मेया
पिपरका फूल कतर खाया
बगानिलाची नवा सहेल
वसु लागे पलकानी
बगानिळाची नवो चंदन छबीला.

(आंब्याच्या मोहरापेक्षां, पिंपळाच्या पानापेक्षां चांगलें गोंदलें आहे. तुझी छबी चंद्राप्रमाणें दिसते आहे. वेलचीच्या फुलाप्रमाणें सुईनें काढलें आहे. मला काय बक्षीस देतेस ? ).

---

प्रा. न. र. फाटक

# अलिकडील टिळकचरित्रें :५:

[ लोकमान्यांच्या जन्मशताब्दीच्या निमित्तानें प्रसिद्ध झालेल्या टिळकचरित्रांचा परामर्श घेणारे प्रा. न. र. फाटक यांचे चार लेख यापूर्वी नवभारतांत प्रसिद्ध झाले आहेत. प्रस्तुत लेखांत प्रा. फाटक यांनीं या लेखमालेचा समारोप केला असून आजच्या बदललेल्या परिस्थितींत टिळक चरित्र कोणत्या दृष्टिकोनांतून लिहिलें जाणें योग्य होईल याविषयीं चर्चा केली आहे. 'नवभारता'च्या वाचकांना ती उद्बोधक वाटेल अशी आशा आहे. का. सं. ]

पूर्वीच्या लेखांतून बिनबक्षिसाचीं तीन आणि बक्षिसाचीं तीन याप्रमाणें एकूण सहा टिळक चरित्रांची अतिशय त्रोटक रीतीनें पाहाणी केली. अशी पाहाणी करण्यापूर्वी आजच्या पिढीला टिळकांच्या जीवनांतील कोणत्या गोष्टींचा उपयोग होईल, याची विचारपूर्वक निवड करून त्या गोष्टी लिहिल्या पाहिजेत असें सुचविलें होतें. टिळकांच्या ६४ वर्षांच्या हयातीमध्यें त्यांच्या सार्वजनिक कर्तृत्वाला २४ व्या वर्षी आरंभ झाला; तो न्यू इंग्लिश स्कूल, केसरी मराठा हीं वृत्तपत्रें आणि आर्यभूषण छापखाना या तीन संस्थाच्या स्थापनारूपानें झाला. शाळास्थापनेनंतर सुमारें दहा वर्षांनीं त्यांनीं संस्थेचा संबंध तोडून अगदीं स्व-तंत्र अशा सार्वजनिक जीवनांत प्रवेश केला. त्यांच्या कर्तृत्वाची महती येथून पुढें सारखी वाढत गेली. त्यांच्या सार्वजनिक जीवनाची वृत्ति आणि दिशा पूर्णपणें निराळी होती. रानडयांकडे आगरकर-टिळक शाळा काढण्याच्या हेतूनें सल्लामसलतीसाठीं जात असतां एकदां रानडयांच्या मित्रांनीं या तरुणांची थट्टा चालविली. रानडयांनीं तेव्हां त्यांच्यापाशीं जो अभिप्राय व्यक्त केला, त्यांत आगरकर-टिळकांच्या लोकसेवेचें रहस्य आढळून येतें. "आजवर पेन्शनर, डॉक्टर, वकील वगैरे लोक आपली आवड-सवड संभाळून सार्वजनिक चळवळ करीत होते. हे तरुण देशोद्धाराच्या एका कार्याला आपलें आयुष्य समर्पण करण्याच्या महत्त्वाकांक्षेनें प्रेरित झालेले आहेत. देशोद्धाराचा एक नवा मार्ग उदयास आणणार आहेत, म्हणून त्यांची थट्टा करण्याऐवजीं त्यांना उत्तेजन दिलें पाहिजे, साह्य केलें पाहिजे." अशा अर्थाचा तो अभिप्राय आहे. निर्वाहाचें एक लोकोपयोगी प्रतिष्ठित साधन या दृष्टीनें पुण्यांत कांहीं खाजगी शाळा होत्या. विष्णुशास्त्री चिपळूणकरांनीं शाळा काढण्याचा निश्चय केला तेव्हां त्यांच्यापुढें इतर शाळाचालकांपेक्षां वेगळें ध्येय नव्हतें, असें आगरकरांनीं एका लेखांत स्पष्ट लिहिलेलें आहे. मिशनऱ्यांप्रमाणें शिक्षणाला वाहून घेण्याचें ध्येय आगरकर-टिळकांचें होतें. विष्णुशास्त्र्यांनीं आपल्या भावास लिहिलेल्या पत्रांत 'टिळक-आगरकरांनीं आपल्याला भेटून कांहीं योजना सांगितली,' असें म्हटलें आहे. योजनेचें स्पष्टीकरण असतें तर कदाचित् आगरकरांच्या लिहिण्याला दुजोरा मिळाला असता. निर्वाहापुरतें वेतन घेऊन शिक्षणाचें काम करावयाचें, या कल्पनेचें स्थिरत्व म्हणजे डेक्कन एज्युकेशन सोसायटी. टिळकांनीं या कर्तृत्वाचें स्वरूप आपल्या ठळक सहकाऱ्यांच्या मृत्युलेखांतून उघडकीस आणलेलें आहे व तेंच अक्षरशः टिळ-








कांच्या कर्तृत्वाचें स्वरूप आहे. पुढील उतारे त्याला स्पष्टता आणतील.

" सत्याचा, करारीपणाचा, एकनिष्ठतेचा आणि स्वार्थत्यागाचा महिमा इतका विलक्षण आहे कीं, भरभराटीच्या पाठीस लागलेल्या मनुष्यासहि दारिद्र्यांत राहून पूर्ण एकनिष्ठेनें देशसेवेस लागणाऱ्या मनुष्याचा महिमा अखेर गावा लागतो... आपल्या कर्तबगारीनें व्यावहारिक उन्नति आपण प्राप्त करून घेऊं असा निश्चित भरंवसा असतां, आगरकरांप्रमाणें मनोदेवतेस साक्ष ठेवून संकटें, विपत्ति, हाल-अपेष्टा सोसूनहि मी आपलें देशकार्याचें मनोगत पूर्ण करीन असें म्हणणारे पुरुषच खरे धीर पुरुष होत. "

" गोखल्यांच्या अंगीं अनेक गुण होते. पण मुख्य गुण म्हटला म्हणजे निर्लोभ अंतःकरणानें वेळींच देशकार्याला वाहून घेणें हा होय... इंद्रियशक्ति शाबूत आहेत, स्वार्थासाठीं उद्योग करण्यास शरीर समर्थ आहे, वार्धक्य अजून दूर आहे, आणि संसारांतील सुखांचें स्वरूप अद्याप मनोहर असून तिकडे चित्ताची प्रवृत्ति होणें साहजिक आहे अशा वेळीं आणि विशेषेंकरून या दिशेनें गेलें असतां आपणास यश मिळण्याचा संभव इतरांपेक्षां कांकणभर अधिक आहे अशी मनास खात्री वाटत असतांहि सर्व मनोहर देखाव्यावरून दृष्टि मागें ओढून यथाशक्ति आपल्यास देशकार्याला वाहून घेणें, त्यांत आलेलीं संकटें सोसण्यास कबूल असणें किंबहुना त्यांतच आनंद मानणें याला एक प्रकारचा बळकट मनोनिग्रह लागतो आणि तो मनोनिग्रह ज्याने दाखविला व नुसता दाखविला नव्हे तर आमरणान्त कायम ठेवला तोच पुरुष धन्य होय. "

महाराष्ट्रानें स्वार्थत्यागी देशसेवेचा घालून दिलेला कित्ता इतरांनीं आस्थापूर्वक गिरविल्याचें एक उदाहरण लाहोरास स्थापन करण्यांत आलेल्या दयानंद अँग्लो वैदिक कॉलेजाचें आहे. त्यामागून देशाच्या निरनिराळ्या भागांत निघालेल्या अनेक लोकोपकारी संस्थांना हाच कित्ता मार्गदर्शक झाला. देशांतील अशा संस्थांच्या परंपरेचा उगम आगरकर-टिळकांच्या कर्तृत्वांत आहे.

आगरकरांच्या गुणांबद्दल जें लिहिलें तेंच टिळकांनीं आगरकरांमागून वीस वर्षांनीं निधन पावलेल्या गोखल्यांच्या बद्दल लिहिलें. 'इंद्रियशक्ति शाबूत, स्वार्थासाठीं उद्योग करण्यास शरीर समर्थ,' याप्रमाणें सर्व प्रकारची अनुकूलता असतां तिचा फायदा न घेतां तारुण्याच्या प्रभातकाळीं देशकार्यास वाहून घेण्याचा मनोनिग्रह हा टिळकांच्या जीवनांतील अत्यंत महत्त्वाचा गुण आहे. 'आणि हा मनोनिग्रह ज्यानें दाखविला व नुसता दाखविला नव्हे तर आमरणान्त कायम ठेवला तोच पुरुष धन्य होय' ही धन्य पुरुषाची टिळकांनीं केलेली व्याख्या टिळकांच्या बाबतींत अक्षरशः खरी आहे. आगरकर गोखले या एकावेळच्या सहकाऱ्याविषयीं लिहीत असतां टिळक जणू काय आत्मचरित्रच सांगत आहेत, अशी वाचकाची भावना झाल्यास नवल नाहीं.

एकदां पूर्ण विचारान्ती अढळ निश्चयानें टिळकांनीं देशसेवेचा जो मार्ग स्वीकारला, त्याचें स्वरूप कालान्तरानें पालटलें तरी तो निश्चय कायम होता. लोकशिक्षणाकरितां अस्तित्वांत आणलेली शाळा – सोसायटी सोडली, पण वृत्तपत्रें हें लोकशिक्षणाचें साधन टिळकांनीं हातीं घेतलें. वृत्तपत्रें शाळेमागून काढतेवेळीं लोकशिक्षण हाच त्यांच्यामागें हेतु असल्याचा खुलासा बर्वेप्रकरणाची शिक्षा भोगून टिळकआगरकर स्वस्थानी आल्यानंतर न्यू इंग्लिश स्कूलच्या अहवालांत 'वृत्तपत्रांचें शुक्रकाष्ट नको' असें सुचविणाऱ्या लोकांच्या समाधानासाठीं मुद्दाम दाखल केलेला आढळतो. त्यानंतरच्या एक दोन वर्षांत सामाजिक सुधारणा व राजकीय सुधारणा यावरून सोसायटीच्या कार्यकारी सभासदांतील बेबनाव वाढत जाऊन टिळक कर्जासह वृत्तपत्रें घेऊन



अनुक्रमणिका








सोसायटींतून बाहेर पडले. जें छत्र आपण उभें केलें व ज्याच्या छायेंत उणीपुरीं दहा वर्षें काढलीं, तें कायमचें दृष्टीआड केल्यामुळें टिळक एकप्रकारें किंचित्काळ निराश्रिताच्या अवस्थेंत होते, असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. सोसायटीला रामराम ठोकण्यापूर्वीं क्राफर्ड प्रकरणांत भाग घेऊन व पुढें संमतिवयाच्या कायद्याला विरोध करून लोकप्रियतेची मर्यादित भूमिका टिळकांनीं तयार केली होती, परंतु वृत्तपत्रें, कुटुंब, वृत्तपत्रांचें कर्ज यांसाठीं बलवत्तर आत्मविश्वासाखेरीज तेव्हां दुसरें भांडवल त्यांच्याजवळ नव्हतें. त्या भांडवलावर टिळकांनीं आपलें स्थित्यंतर यशस्वी होईल, अशी तयारी केली.

टिळकांच्या घरगुती संस्कारांत धर्मपरंपरेच्या अभिमानाचा अंश मोठा होता. कॉलेजांत व नंतरच्या काळांत मिल्ल, स्पेन्सर, कॉम्ट प्रभृतींच्या समाजशास्त्र्यांच्या अभ्यासानें या अभिमानाची धार इतस्तत: थोडीफार बोथटली असली तरी हिंदु धर्मपरंपरेला झिडकारण्याइतकी त्यांच्या विचारसरणीची मजल पोंचली नव्हती. कालानुसार कित्येक सामाजिक सुधारणा टिळकांनीं स्वत:च्या व्यवहारांत स्वीकारल्या होत्या, परंतु त्यांचें उघड समर्थन त्यांनीं केलें नाहीं. सामाजिक सुधारणेच्या पुरस्कारामुळें समाजांत फूट माजल्याचें ते पहात होते, सुधारणापक्षाचा विरोध लोकसंख्या विचारांत घेतल्यास अतिशय मोठा होता. त्या विरोधाचें साह्य घेऊन टिळकांनीं आपलें नवें आसन स्थिर केलें. मूळचा धर्माभिमान सदर विरोधाला अनुकूल होता. सुदैवानें संमतिवयाच्या कायद्याविषयींचा लोकक्षोभ टिळक सोसायटी सोडून बाहेर पडले तेव्हां चांगला धडाडत होता. त्याला टिळकांनीं आपल्या विवादकुशलतेनें इंधन पुरविलें. त्यामागून रमाबाईच्या सेवासदनाचें प्रकरण निघालें. पुढें लवकरच मुसलमानांच्या दंग्यामुळें हिंदुसमाजाचा पुढारीपणा टिळकांना जवळ जवळ कायमचा आपलासा करतां आला. मुसलमानांच्या दंग्यांतून उद्भवलेल्या सार्वजनिक गणेशोत्सवाचें धुरीणत्व टिळकांकडे जाणें स्वाभाविक होतें, शिवाजी-उत्सवाला १८९५ पासून चढता वाढता उठावदारपणा या सुमारास टिळकांच्या प्रयत्नानें दिसूं लागला. सामाजिक सुधारणा व कॅांग्रेस यांची स्पष्ट फारकत व्हावी, ही कल्पना कॅांग्रेसच्या पुढाऱ्यांना पटविण्याची कामगिरी टिळकांनीं १८९० सालीं अंगावर घेतली होती. १८९५ मध्यें पुण्यांत कॅांग्रेसचें अधिवेशन भरण्याचा योग आला तेव्हां टिळकांना या कल्पनेचा अंमल घडवून आणणें शक्य झालें. ही सर्व हकीकत १८९१ ते १८९५ या पांच वर्षांतली असून टिळकांनीं आपल्या नव्या आसनाला कशी बळकटी आणली हें समजण्याकरितां सदर हकीकतीचा उपयोग आहे. शाळा-सोसायटी सोडली तर त्यांनीं नवी शाळा काढण्याचा मोह धरला नाहीं. संमतिवयासंबंधाचा वाद चालू असतां नवी शाळा टिळकजिनसीवाले यांच्या पुढाकारानें स्थापन होणार अशी लोकवार्ता पसरली होती, नव्हे तर तशी जाहिरातदेखील प्रसिद्ध झाली होती. टिळकांनीं लोकवार्तेप्रमाणें जाहिरातसुद्धां रिकाम्या उपद्व्यापासारखी असल्याचें लोकांच्या निदर्शनास आणलें. यावर जुन्या संस्थेचें प्रेम असल्याचा आक्षेप निघाला व तोहि त्यांनीं मानवून घेतला. लोकांतल्या मान्यतेमार्गें सरकार-दरबारांतील प्रतिष्ठा असल्यास सार्वजनिक सेवा अधिक सुकर होईल या समजुतीनें टिळक कायदेमंडळाचे व विद्यापीठाचे सभासद झाले हा तर्क चुकीचा ठरणार नाहीं, त्या काळीं कायदेमंडळाच्या नामदारीची लोकांत किंमत होती, हें प्रसिद्ध आहे. लोकप्रियता व नामदारी यांच्या संयोगानें टिळकांचा पुढारीपणा एकप्रकारें पूर्णत्व पावला.

सनातन विचारसरणी आणि त्या विचारसरणीला पोसणारे गणेशोत्सवासारखे उत्सव यांचा टिळकांनीं जो अत्यंत ईर्ष्येनें पाठपुरावा चालविला होता, त्याच्या








समर्थनाकरितां असें म्हणतां येण्यासारखें आहे कीं राजकारणांत पक्षोपपक्षांच्या फाटाफुटीला संधी कमी म्हणून टिळकांनीं केवळ राजकारणाकडे आपलें सर्व बळ लावण्याचें व्रत स्वीकारून सामाजिक सुधारणांच्या व सुधारकांच्या संबंधांत तीव्र प्रतिवाद आरंभला, अशा समर्थनांत मुळींच तथ्य नाहीं, असें नाहीं. एकदां राजकारणाचा डाव जिंकला कीं सामाजिक सुधारणांचा प्रश्न सहज सोडवितां येईल, हा टिळकांचा ग्रह मात्र बिनतोड युक्तिवादावर आधारलेला नव्हता, हें म. गांधींची चळवळ चालू असतां व आज स्वराज्यांत सामाजिक सुधारणेसंबंधांतल्या अनुभवानें सिद्ध झालें आहे. अद्यापि भारतामध्यें सामाजिक समतेचा वाद आणि प्रयत्न करावा लागतो. यावरून टिळकांच्या सामाजिक सुधारणाविषयक धोरणाचें उचितानुचितत्व पारखतां येतें.

टिळकांनीं राजकीय चळवळीवर भर दिला, आणि स्वतंत्रपणें लोकसेवा करूं लागल्यापासून अवघ्या सात वर्षांनीं रँडसाहेबाच्या खुनाचें निमित्त सांपडतांच टिळकांवर सरकारी वक्रदृष्टीचा तडाखा सोसण्याची पाळी आली. टिळक केसरीमराठ्यांत जळजळीत लेख लिहून स्वस्थ रहात नव्हते तर सरकारला विरोध करण्याचा जो प्रसंग असेल, त्या प्रसंगाशीं समरस होऊन लोकजागृतीचा व तिच्या बळावर लोकसंघटनेचा अविश्रांत उद्योग करणारे होते. याचा अनुभव १८९६ मध्यें त्यांनीं दुष्काळांत व १८९७ सालीं प्लेगच्या साथींत आणून दिला. इंग्रजी राज्यांतील कायद्याला धरूनच ते लोकजागृति करीत होते. पण लोकांनीं जागृत होऊन आपल्याच कायद्यानें आपल्या राज्यकारभारांत अडथळे उत्पन्न करावे हें इंग्रज राज्यकर्त्यांना रुचत नव्हतें. हिंदुमुसलमानांचे दंगे, दुष्काळांतील सारावसूली, प्लेगची सरकारी व्यवस्था, यांस अनुलक्षून टिळकांनीं केसरींत लिहिलेले लेख पाहिल्यास त्यांत सरकारी दोषांबद्दल स्पष्टोक्ति असली तरी इंग्रजी राज्य नष्ट करावें अथवा व्हावें, अशा तऱ्हेची प्रवृत्ति त्यांत आढळत नाहीं. लोकांना कायद्यानें दिलेल्या हक्कांचें ज्ञान असावें किंबहुना त्यांनीं ते हक्क भोगण्याचा यत्न करावा, असा उपदेश त्यांच्या लेखांतून दृष्टीस पडतो. लोकांत स्वाभिमान उरलेला नाहीं, ही शोचनीय स्थिति टिळकांनीं पुनः पुनः आपल्या लेखांतून दाखविली आहे. आज त्या लेखांचा पुष्कळसा भाग दुर्बोध आणि निरर्थक ठरणारा आहे. उदाहरणार्थ, मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड हॅरीस यांच्यासंबंधांतील लेखांचा निर्देश करतां येईल. भावी इतिहासाला या गव्हर्नराचें नांव उच्चारण्याइतकें देखील महत्त्व वाटणार नाहीं. पण त्याचें स्मारक करण्याचा उत्साह जेव्हां कित्येकांमध्यें दिसला तेव्हां तो उत्साह स्वाभिमानशून्यतेच्या पराकाष्ठेसारखा टिळकांना वाटला. रँडच्या खुनानंतरच्या लेखांत पुण्यांत ब्राह्मणांचा कट असल्याच्या कल्पनेविरुद्ध आपला उद्वेग टिळकांनीं तीव्र भाषेनें उघडकीस आणला आहे. खुनी इसमाला शोधून काढा व फासावर चढवा, पण दोन चार जणांच्या गुन्ह्यासाठीं सारी जनता भरडणें योग्य नव्हे, असें त्या लेखांतील कांहींच तात्पर्य आहे. प्लेगच्या बंदोबस्ताबद्दल लिहितांना टिळकांनीं कामचुकार स्वजनांनाहि दोष दिला आहे. गोऱ्या सोजरांच्या अत्याचारावरहि ताशेरा झाडला आहे. प्लेगच्या सरकारी इस्पितळांत रोग्यांचे हाल होतात म्हणून टिळकांनीं स्वतंत्र इस्पितळ उघडलें व त्यावर जातीनें देखरेख ठेवली, हा टिळकांच्या कामगिरीचा महत्त्वाचा भाग आहे व त्यांत स्वावलंबन आणि स्वाभिमान या दोन्ही गुणांचा अंतर्भाव दृष्टीस पडतो. टिळकांच्या पुढारीपणाचें मर्म या कृतींत आहे. त्यांच्या सरकारवरील टीकालेखांत नाहीं; कारण तसे किंवा त्यांच्याहून जास्त कडक लेख पुण्याच्या दुसऱ्या वृत्तपत्रांतूनहि प्रसिद्ध केले जात होते. सरकारी व्यवस्थेला इस्पितळापुरतें टिळकांनीं लाजविलें व अशा

कामगिरीमुळेंच सरकारांत त्यांच्याविषयीं वैषम्य वाटावें हें स्वाभाविक होतें.

पुण्यांतली प्लेगची साथ संपली व एक दोन महिने लोटले नाहींत तोंच रँडचा खून झाला. सरकारला आपलें वैषम्य उगवून घेण्याची संधी मिळाली. टिळकांवर राजद्रोहाचा आरोप लादून सरकारनें खटला भरला. त्या खटल्यांत टिळकांनीं जें धैर्य दाखविलें तें सदैव बोधप्रद आहे. टिळकांनीं आपल्या वागणुकीनें स्वाभिमानाचा धडा शिकविला. पण आपण राजद्रोहाचा गुन्हा केलेला नाहीं, ही त्यांच्या मनाची खात्री सुद्धां ध्यानांत ठेवणें अवश्य आहे. ती खात्री चुकीची नव्हती, हें न्यायाधीशानें कायद्याच्या कलमाचा अर्थ फिरवून शिक्षा ठोठावली यावरून सिद्ध होतें. या खात्रीवरून आणखी एक निष्कर्ष निघतो. टिळक सरकारचे टीकाकार होते. पण त्याचा विनाश इच्छिणारे किंवा तसा उद्योग करणारे शत्रु नव्हते, असा तो निष्कर्ष आहे. टिळकांच्या खटल्यांतून त्यांच्या राजकीय पुढारीपणाविषयीं अत्युक्ति प्रचुर तात्पर्य काढणारासाठीं या निष्कर्षाची आवश्यकता आहे. या खटल्याच्या निवेदनांत बंगाल प्रांतांतून पैशाचें व कायदेपंडितांचें साह्य टिळकांना लाभलें या गोष्टीला जें महत्त्व आहे तें उभयपक्षीं कोणते कायदेपंडित होते, त्यांनीं काय म्हटलें या तपशीलाला नाहीं. विलायतेस त्यांच्या सुटकेसाठीं जो यत्न झाला त्याच्या मुळाशीं त्यांच्या संशोधनपर विद्वत्तेचें कौतुक होतें; टिळकांनीं राजद्रोहाचा गुन्हा केला नसावा, ही भावना सुटकेच्या अर्जामागें नव्हती असें निदान मॅक्समुल्लरच्या चरित्रामध्यें जो याविषयाचा खुलासा पत्राच्या रूपानें दाखल आहे, त्यावरून म्हणतां येतें. आपण स्वीकारलेलें कर्तव्य पार पाडतांना सरकारी रोषाचें संकट उद्भवण्याचा संभव टिळकांना माहीत होता. परंतु संकटापुढें कच खाणें म्हणजे आपलें शील गमावण्यासारखें असून शीलभ्रष्ट पुण्यांत राहिला काय किंवा अंदमान बेटांत राहिला काय सारखेंच असें टिळकांचें मनोगत होतें. खटला चालू असतां, शिक्षा ऐकतांना व भोगतांना त्यांच्या चित्ताची शांतता भंगली नाहीं, याचें बीज सदर मनोगतांत आहे. सरकारनें दया दाखविल्यास टिळक तिचा अव्हेर करणारे नव्हते, पण दयेची भिक्षा मागणारेहि ते नव्हते. त्यांना शिक्षेच्या मुदतींत सूट मिळाली व कांहीं अटीवर त्यांनीं ती पत्करली. आपल्या हातून राजद्रोह घडायचा नाहीं अशी त्यांच्या मनाची खात्री या अटींत सुद्धां प्रत्ययास येते.

टिळक कैदतून सुटल्यानंतर तीन वर्षांनीं ताईमहाराजांच्या प्रकरणाचें सुदर्शन त्यांच्या पाठीस लागलें. त्याचें स्वरूप राजद्रोहाच्या खटल्यापेक्षां भयंकर होतें, तथापि त्यांतून ते १९०४ सालीं सहीसलामत बाहेर पडले. हा खटला त्यांच्या चारित्र्यावर कलंक फासण्याच्या प्रयत्नाचा होता व सरकारानें तो प्रयत्न छळाच्या बुद्धीनें केल्यामुळें टिळकांना हायकोर्टानें निर्दोष ठरविलें. तेव्हां टिळकांची महती लोकांमध्यें वाढली. एकप्रकारें हा सरकारी उपद्व्याप टिळकांना उपकारक झाला. १८९७ पासून टिळकांविषयीं मुंबई सरकारानें जो विपरीत ग्रह करून घेतला तो शेवटपर्यंत कायम राहिला. ताईमहाराज प्रकरणाच्या काळांत टिळकांना शारीरिक व कौटुंबिक (ज्येष्ठ पुत्राचा मृत्यु) आपत्ति सोसाव्या लागल्या. त्या धैर्यानें सोसून त्यांनीं वृत्तपत्रकार व पुढारी या नात्यांचीं कर्तव्यें शांत चित्तानें बजावलीं, याचें महत्त्व ताईमहाराज प्रकरणाशीं केलेल्या झगड्याहून अधिक आहे व आजच्या पिढीपुढें टिळकांच्या तत्कालीन धैर्यशाली वर्तनाचा आदर्श ठेवणें अवश्य आहे. एकीकडे दैवी मानवी संकटाशीं झुंझत असतां कर्तव्यनिष्ठेंत कुठल्याहि प्रकारें कमतरता न राहूं देण्याची दक्षता बाळगणें हा गुण सदर प्रकरणाच्या काळांत टिळकांच्या सर्व खाजगी व सार्वजनिक व्यवहारांत अतिशय प्रखर-








तेनें उठून दिसतो. टिळकांच्या अलीकडील व त्यापूर्वीच्या चरित्रकारांनीं टिळकांच्या प्रकृतीमधील प्रस्तुत गुणाला स्थान दिलेलें आहे, पण तें ताई-महाराज प्रकरणाच्या आज कंटाळवाण्या वाटण्या-सारख्या हकीकतीच्या रटाळांत गुरफटल्यानें तो गुण उत्कटतेनें वाचकाच्या मनावर परिणाम करीत नाहीं.

ताईमहाराजप्रकरण फौजदारी हल्ल्यांतून निभावल्यावर टिळकांनीं लोकसेवेचा मार्ग जोरानें चोखाळण्यास आरंभ केला. आतां त्यांना वंगभंगाच्या क्षोभाचा उपयोग झाला. सुरत येथील कॉंग्रेस अधि-वेशनाचा प्रसंग हा वंगभंगानें जनतेस शिकविलेल्या कर्तव्यांच्या ठरावाची भाषा पूर्वीप्रमाणेंच जशीच्या तशी राहूं द्यावयाची का सरकारी दडपशाहीच्या परिणामाचा अंदाज पाहून ती भाषा बदलायची या वादांतून उद्भवला. तेव्हांसुद्धां टिळकांची भूमिका अल्पविचारी कर्तव्यनिष्ठेचीच दिसून येते. टिळक जसे आग्रही होते तसेच कार्याची हानि होत असेल तर आपला आग्रह शिथिल करण्यालाहि ते कचरत नव्हते, असा आणखी एक गुण सुरतेच्या प्रसंगीं निदर्शनास आला होता. त्या गुणाच्या स्वागताची वृत्ति प्रतिपक्षानें दाखविली नाहीं; १९१६ सालीं टिळकांनीं कॉंग्रेसमध्यें प्रवेश करतांना आपला आग्रह मागें घेतल्याचें प्रसिद्ध आहे.

१९०८ मध्यें त्यांच्यावर राजद्रोहाच्या आरोपाचें संकट कोसळलें. टिळकांच्या लोकप्रियतेला फिरून एकदां सरकारी रोषानें हातभार लावला. मोर्ले व मुंब-ईचा गव्हर्नर सीडनहॅम यांच्या पत्रव्यवहारांत याचा पुरावा दृष्टीस पडतो. टिळकांकडे दुर्लक्ष केलें असतें तर फायदाच झाला असता अशा भावार्थाचा मज-कूर मोर्लेच्या एका पत्रांत आहे, "मला होणारी शिक्षा माझ्या कार्याला मदत करील" असा जो आशय टिळकांनीं ज्यूरीचा निकाल ऐकल्यावर काढलेल्या गंभीर उद्गारांत आहे, त्यालाहि मोर्लेच्या वरील मजकुरानें दुजोरा मिळतो. या खटल्याची इत्थंभूत माहिती आज सांगावी असें स्वारस्य तिच्यांत नाहीं. टिळकांनीं किती तास आपल्या बचावाचें भाषण केलं, त्यांनीं सरकारी साक्षीदारांची आपल्या प्रश्नांच्या भडीमारानें कशी गाळण उड-विली, वगैरे गोष्टींची आजच्या पिढीला गरज नाहीं. टिळकांची थोरवी असल्या गोष्टींत नसून त्यांच्या प्रकृतिसिद्ध धैर्यशाली कर्तव्य निष्ठेंत आहे. सरकारा-विरुद्ध लोकजागृति करण्याच्या व्यवसायांतच राज-द्रोहासारख्या खटल्यांच्या संकटाचीं बीजें अस-तात याची जाणीव टिळकांनीं १८९७ सालींच व्यक्त केली होती. १९०८ चा खटला अनपेक्षित नसला तरी सहा वर्षांच्या दीर्घ कारावासाची शिक्षा कदा-चित् अनपेक्षित असेल, पण त्या शिक्षेनें त्यांचें चित्त व्यथित झालें नाहीं. उलट शिक्षा साधी व रहाण्याची व्यवस्था स्वतंत्र असल्यानें त्यांनीं गीते-संबंधीं ग्रंथ लिहिण्याची अभ्यासपूर्वक मनांत रुज-विलेली कित्येक वर्षांची आकांक्षा सफळ केली. प्रस्तुत ग्रंथलेखनांत टिळकांच्या बुद्धीचे जे गुण प्रत्ययास येतात, त्यांची ओळख नव्या पिढीला जितक्या व्यवस्थितपणें करून देणें अवश्य आहे तेवढी करून दिली जात नाहीं. हा ग्रंथ प्रसिद्ध होतांच त्याविरुद्ध रण माजलें व तें टिळकांनीं आप-ल्या ज्ञानवैभवानें लढविलें. अजूनहि तें रण पूर्णपणें शमलेलें नाहीं. तथापि गीतारहस्यासंबंधाचा वाद टिळकांच्या बुद्धिगुणांना बाधणारा नाहीं. ज्यांना विद्याव्यासंगाची गोडी आहे, आपल्या विद्याव्यासंगानें एखाद्या विषयाच्या ज्ञानांत नवी भर घालावी अशी ज्यांना इच्छा असेल त्या होतकरूंना गीतारहस्याचें लेखन प्रकाशन इत्यादिकांतून शिकण्यासारखा भाग पुष्कळच आढळल, तुरुंगांतील हस्तलिखिताची पहाणी केल्यास तीहि बोधप्रद ठरणारी आहे. सवाच्य हस्ताक्षर सुबोध वाक्यरचना एकंदर शेकडो पानांत भरलेल्या मजकुरांच्या मानाने काढघालीचा प्रकार फार कमी,







आधाराचे मार्मिक उतारे इत्यादि गुण त्यामध्यें दृष्टीस पडतात. गीतारहस्यापूर्वींचे दोन ग्रंथ टिळकांनीं इंग्रजी भाषेंत लिहिले, कारण त्या ग्रंथविषयांचे ज्ञाते युरोप अमेरिकेमध्यें जास्त होतें. शिवाय त्या विषयाच्या ज्ञानाचा प्रत्यक्ष लोकव्यवहारांत उपयोग नव्हता. गीतारहस्य हा ग्रंथ व्यवहारोपयोगी म्हणून स्वजनांच्या हितासाठीं त्यांनी मराठी भाषेंत लिहिला. राजकीय पारतंत्र्याच्या भीषण स्थितींत स्वोद्धाराच्या ध्येयवादाचा उत्साह टिकवून धरण्याच्या उपायाचें विवेचन गीतारहस्यांत आहे. निष्काम कर्मयोगाची दीक्षा महाराष्ट्रियांनीं पर्यायानें भारतीयांनीं घेतली पाहिजे या भावनेनें तो ग्रंथ मराठींत लिहिला व त्याचीं एक दोन भाषांतरें टिळकांनीं आपल्या देखत इतर देशी भाषेंत करविलीं. इंग्रजी तर्जुम्याची ओढ त्यांच्या मनाला तितकीशी नव्हती.

तुरुंगामध्यें दोन सव्वादोन वर्षें लोटल्यावर अवघ्या सुमारें चार महिन्याच्या अवधींत छापल्यानंतर जवळजवळ ज्याची हजारांच्या घरांत घरण्याइतकी पानें भरलीं तो सारा ग्रंथ टिळकांनीं स्वहस्तें लिहून पूर्ण केला, या वस्तुस्थितींत सुद्धां टिळकांच्या बुद्धिमत्तेचें कांहींसें लोकोत्तरत्व प्रत्ययास येतें. हें कार्य शेवटास नेल्यावर पुढील तीन साडेतीन वर्षांचा काळ त्यांनीं नव्या ग्रंथाच्या संकल्पाचीं टाचणें टिपणें करण्यांत घालविला. वैदिक क्रॉनालाजी या एकाच विषयावर कांहीं प्रकरणें लिहिलीं व तो तसाच अपूर्ण राहिला. सुटकेपासून निधनापर्यंतच्या सहा वर्षांत टिळकांना ग्रंथलेखनाकडे वळण्याला सवडच मिळाली नाहीं.

सुटकेनंतरच्या काळांत त्यांनीं होमरूलची चळवळ आरंभली. १९१४ च्या आगस्टांत युरोपांत महायुद्धाच्या ज्वाला भडकून त्यायोगानें हिंदी राजकारणांचें वातावरण बदललें. टिळकांनंतर पुनः राजद्रोहाचा आरोप आला पण थोडक्यांत हें संकट आटपलें. तथापि एखाद्या प्रदेशांत जाण्याची मनाई किंवा क्वचित् भाषणबंदी यासारखे प्रसंग त्यांना भोंवत होते. १९१८ सालीं टिळक लंडनला चिरोलवरील खटल्यासाठीं गेले; पण त्या खटल्याचा निकाल टिळकांवर उलटला. पुढें त्यांनीं आपलें मुख्य ध्येय जें राजकारण त्यांत कित्येक महिने घालविले. परत आलें तों मांटेग्यू– चेम्सफर्ड या जोडीनें सुचविलेल्या राज्यसुधारणांचा कायदा पास होऊन टिळकांच्या प्रेरणेची ‘प्रतियोगी सहकारिता’ वादाच्या भोवऱ्यांत सांपडली. १९१९ अखेर भरलेलें अमृतसरचें कॉंग्रेस अधिवेशन हें टिळकांच्या आयुष्यांतलें शेवटचें अधिवेशन. १९२० च्या १ आगस्टला त्यांच्या जीवनाची ज्योत विझली. टिळक १९१५ पासून ज्या स्वराज्यासाठीं अविश्रांत उद्योग करीत होते, तें स्वराज्य जास्त व्यापकरूपानें त्यांच्यामागून सत्तावीस वर्षें लोटल्यावर म. गांधीच्या पुढाकाराखालीं चाललेल्या चळवळीच्या वाट्यास आलें.

टिळकांची विद्यार्थीदशा चरित्रकारानीं नेहमींच विचारांत घ्यावी, असें तिचें महत्त्व आहे. ते पहिल्या श्रेणींत पास झाले यासाठीं त्या दशेचें महत्त्व नसून त्यांची विद्यार्जनपद्धति महत्त्वाची आहे. पहिल्या श्रेणींत पदवीची परीक्षा उत्तीर्ण होणारे विद्यार्थी प्रतिवर्षीं पहायला सांपडतात, इतकेंच नव्हे तर कित्येकदां मोठ्या संख्येनें पहायला सांपडतात. परंतु लोकोपयोगी कामगिरी तर राहोच, पण नुसत्या विद्वत्तेनेंसुद्धां त्यांतले बहुधा कोणीच लोकांमध्यें उठून दिसत नाहींत. परीक्षेंतील प्रथम श्रेणी म्हणजे विशेष आयासांखेरीज नोकरी मिळवून देणारी पायरी, एवढाच या श्रेणीचा अर्थ समजला जातो. ही श्रेणी जिंकायला नेमलेल्या पुस्तकांचा अभ्यास पुरतो. सदर श्रेणीच्या जोरावर कारकुनी पत्करणारांना ज्ञानोपासनेची गरज नसते. विद्यादानाच्या संस्थांत स्वार्थत्यागाच्या बढाईनें अध्यापकांचें काम करणारे देखील नेमलेलीं पुस्तकें शिकविण्यापलीकडे

पहात नाहींत व यामुळें त्यांचीहि ज्ञानवृद्धि थांबते. या विधानाला अपवाद निघतील, पण ते मागील विधानाला पुष्टि देणारे आहेत. टिळक अभ्यासाच्या पुस्तकाला धरून त्या त्या पुस्तकांतील विषयासंबंधांचें आपलें ज्ञान वाढवीत होते; हा कित्ता सर्व काळीं विद्यार्थीदशेला उपकारक ठरणारा आहे. टिळकांच्या विद्यार्थीदशेंतील अभ्यासविषयक अनेक विश्वसनीय आख्यायिका आहेत. विद्येची गोडी लावून घेण्याला खरी अनुकूलता विद्यार्थीदशेंतच लाभते. नंतर जीविकेचा उद्योग सुरू झाल्यावर पूर्वीच्या गोडीनें विद्याव्यासंग होऊं शकतो; नव्यानें गोडी लावून घेणें बहुतांशीं असाध्यच ठरतें. टिळकांनीं शाळेचीं व इतर सार्वजनिक कामें करीत असतां 'ओरायन' हा प्रबंध सिद्ध केला, त्याचें बीज त्यांच्या विद्यार्थीदशेंतील अभ्यास-पद्धतींतच आढळेल. १८९७ सालीं त्यांनीं तुरुंगांत 'आर्क्टिक होम'ची तयारी केली आणि सुटकेनंतरच्या धकाधकीमध्यें वेळांत वेळ काढून तो लिहून छापून काढला. गीतारहस्यामागें असाच व्यासंगाचा प्रकार अनुभवास येतो. ज्ञानाखेरीज स्वोद्धाराचा रामबाण उपाय नाहीं, या जाणिवेनें शाळा काढली. हल्लीं न्यू इंग्लिश स्कूलच्या व फर्ग्युसन कॉलेजाच्या धर्तीवर सहज गणती न करतां येण्याइतक्या शिक्षणसंस्था जन्मल्या आहेत व त्यांची परंपरा थांबण्याचा संभव नाहीं. शाळा-कॉलेजाप्रमाणेंच विद्यापीठेंहि पुष्कळ अवतरलीं आहेत, परंतु ज्ञानाचा कस शिक्षणसंस्था वाढूनहि मोठ्या प्रमाणांत खालावला आहे. म्हणूनच टिळकांच्या जीवनांत ओतप्रोत भरलेली ज्ञानोपासना नव्या पिढीच्या निदर्शनास आणणें अपरिहार्य आहे.

टिळकांच्या पुण्यतिथीला सामान्यतः जीं भाषणें होतात, त्यांत 'जेव्हां स्वराज्य शब्द उच्चारण्याची चोरी होती' तेव्हां टिळकांनीं 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे व तो मी मिळवीन' हा मंत्र जनतेला शिकविला, असें एकच एक धोरण पुष्कळ ठिकाणीं स्वीकारलें गेल्याचा अनुभव येतो. या मंत्रांतील स्वराज्य शब्द उच्चारण्याची चोरी होती, हा भाग खरा नाहीं व दुसरा भाग आज जनता स्वराज्य भोगीत असल्यानें गतार्थ झालेला आहे. यापेक्षां अन्यायाच्या प्रतिकारांत त्यांनीं आपलें सर्व आयुष्य खर्ची घातलें. स्वराज्यांत सुद्धां अन्याय होऊं लागल्यास त्याच्याशीं झगडण्याची त्यांची इच्छा क्वचित् आख्यायिका–आठवणींतून व्यक्त झालेली आहे, तिच्याकडे टिळकांचें चरित्र सांगतांना लक्ष दिल्यास अधिक लाभ आहे. मग ओघानेंच टिळकांप्रमाणें अन्यायाच्या प्रतिकारापायीं क्लेश सोसणें, ध्येयनिष्ठा क्लेशांतहि कायम ठेवणें, इत्यादि गुणांची महती व उपयुक्तता मनावर ठसते.

टिळकांचा विद्याव्यासंग आणि लोकहिताचें कर्तृत्व यांचें दिग्दर्शन येथवर केलें. टिळकांच्या सार्वजनिक हितासंबंधीच्या विचारांचें आविष्करण ज्या प्रसंगानें घडलें, ते प्रसंग टिळकांच्या अनुकरणीय गुणांचा उलगडा होण्यापुरते थोडक्यांत चरित्रांतून दाखवावे. बापट प्रकरण, ताईमहाराज प्रकरण, हे प्रसंग टिळकांच्या मित्रत्वांतून उद्भवलेले आहेत. ज्याला एकदां आपला मित्र म्हटलें, त्याच्याशीं प्रतारणा करावयाची नाहीं हा टिळकांचा थोर बाणा त्या प्रकरणांतून व्यक्त होतो. आदर्श चारित्र्याला त्या बाण्याची नेहमीच आवश्यकता आहे. सरकारशीं टक्कर देतांना जे मनोनिग्रहाचे गुण टिळकांच्या वागणुकींत प्रगटले तेच ज्येष्ठ पुत्राच्या मृत्यूच्या वेळींहि लोकांच्या अनुभवास आले. खऱ्या चारित्र्यसंपन्नतेमध्यें अशा मनोनिग्रहाचा अंतर्भाव करावा लागतो.

टिळकांच्या वेळेचें राजकारण संपलें; त्यांचे मित्र आणि प्रतिपक्षीहि कालोदरांत विलीन होऊन जवळ जवळ अर्धशतक लोटत आलें. त्यांच्या निधनकाळीं तरुण किंवा त्यापेक्षां वयानें लहान असलेले लोक आज साठी सत्तरीच्या घरांत उतरले आहेत. ज्या भल्याबुऱ्या प्रसंगांतून टिळकांना जावें

लागलें, त्या प्रसंगाची पुनरावृत्ति आजच्या सामान्य नागरिकांना अनुभवास येणारी नाहीं. परंतु टिळकांच्या थोरवीचे गुण ज्यांतून उठावानें दिसतील ते प्रसंग निवडून त्यांच्या चरित्रांत संक्षेपानें गोवले तर त्याचा उपयोग झाल्याशिवाय रहाणार नाहीं. ते गुण व त्या गुणांच्या आविर्भावाचे प्रसंग निवेदन करतांना ते अद्भुतरम्यतेनें रंगविल्यास टिळकांच्या चरित्राची अनुकरणीयता नष्ट होण्याचा संभव चरित्रलेखकानें विचारांत बाळगला पाहिजे. कोणतीहि व्यक्ति जन्मत: असामान्य कोटींतील नसते. पुढें ती आपल्या कर्तृत्वानें असामान्यत्व पावते. त्या कर्तृत्वाला कांहीं उपजत व कांहीं प्रयत्नसिद्ध गुणांचा लाभ मिळतो. जे कमाईचे गुण असतील, ते प्रयत्नानें कुणालाहि मिळवितां येतील. उपजत गुणांची उणीवसुद्धां माणसाला उद्योगतत्परतेनें काढून टाकणें शक्य आहे. उपजत तीव्र बुद्धिमत्तेला जें तासाभरांत आकलन होईल त्यासाठीं मंद बुद्धीच्या माणसाला चार सहा तास लागतील, परंतु ते मंद बुद्धि म्हणून कधींच प्राप्त होणार नाहीं, असा घातकी समज कोणीहि उराशी बाळगूं नये. थोरामोठ्यांचें अनुकरण म्हणजे नक्कल नव्हे. टिळकांनीं तुरुंगांत गीतेवर पुस्तक लिहिण्याचें ध्यानांत ठेवून सविनय कायदेभंगाच्या काळांत कैदेंत पडणारे पुष्कळजण गीतेचा अभ्यास करणारे होते. टिळकांप्रमाणें आपल्या बुद्धींत गीतेचें नवें रहस्य स्फुरेल, अशा समजुतीचे पुष्कळजण त्याकाळीं दिसत असत. या प्रकाराला मागें नक्कल म्हटलें आहे. एखाद्या विषयाचें सांगोपांग अध्ययन व त्याचें सामान्य जनतेच्या ज्ञानांत भर टाकणें हें फळ, हें टिळकांच्या गीतारहस्य लेखनाचें खरें तात्पर्य आहे. सारांश टिळकांचें चरित्र नव्या नव्या पिढ्यांना सदैव मार्गदर्शक कसें होईल हा प्रश्न सोडविणारें असें लिहिलें जावें. इत्थंभूत सविस्तर माहितीचीं चरित्रें टाकाऊ असा मात्र याचा अर्थ नव्हे. जास्त उपयुक्त कोणतें, सविस्तर कीं आटोपशीर यांचा निर्णय वाचक करूं शकतील.

---





अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

श्री. सुनंदा कौंडिन्य

# चरित्रलेखन : एक वाङ्मयप्रकार

चरित्रवाङ्मयासंबंधींची, किंबहुना चरित्र हा एक वाङ्मयप्रकार आहे ह्या संबंधींची जी एक वाङ्मयीन-निखळ कलात्मक जाणीव, ही अगदीं अलीकडील आहे. ही जाणीव निर्माण होण्यापूर्वींहि चरित्रें लिहिलीं जात होतीं. पाश्चात्य देशांत काय किंवा पौर्वात्य देशांत काय, चरित्रवाङ्मयाची परंपरा ही खूप जुनी आहे. परंतु ह्या जुन्या पारंपरिक प्रवाहाला नवें वळण देणारी कलात्मक जाणीव निर्माण झाली ती १९१० च्या सुमारास.

१९१० म्हटलें कीं वैचारिक क्रान्ति डोळयांपुढें उभी राहाते. १९१० पूर्वी जीवनांत ज्या कांहीं प्रवृत्तींचें स्तोम माजलें होतें त्या सर्वांची प्रतिक्रिया म्हणजे ही वैचारिक क्रांति होय. ही वैचारिक क्रांतीची लाट उसळली आणि तिच्यांत धर्म, व्यक्तिसंबंध, राजकारण आणि इतरहि अनेक गोष्टी पावन होऊन निघाल्या. जीवनाकडे पाहाण्याची दृष्टिच बदलली. आणि आपोआंपच कलावाङ्मयाकडे पाहाण्याची – कलावंताची आणि रसिकाची – दृष्टिहि बदलली. चरित्रवाङ्मयहि ह्याला अपवाद नाहीं. चरित्रवाङ्मयाच्या संदर्भांत जेव्हां आपण ह्या बदलत्या प्रवाहाचें स्वरूप न्याहाळूं लागतों तेव्हां एक व्यक्ति विशेष नजरेंत भरते. ती म्हणजे लिटन स्ट्रॅची होय.

## चरित्रवाङ्मयाला मिळालेलें नवें वळण

१९१० पूर्वी म्हणजेच स्ट्रॅचीपूर्वकाळांत, वाङ्मयासंबंधींची निखळ कलावादी जाणीव निर्माण होण्यापूर्वी चरित्रांत, किंबहुना वाङ्मयाच्या कोणत्याहि शाखेंत आदर्शाचें चित्रण करणें आणि आदर्श चित्रण करणें ह्या आदर्शाच्या प्रवृत्तीला अत्यंत महत्त्व होतें. कलावाङ्मयाच्या अंगांगामधून समाजाला उपदेश करणें, समाजाला बोध करणें, समाजाला उन्नत अवस्थेस नेणें इत्यादि आदर्शवादी–ध्येयवादी प्रवृत्तींचें एकच रक्त खेळत होतें. आणि मग आपोआपच आदर्श जीवन, आदर्श व्यक्ति, आदर्श तत्त्वें यांचें चित्रण करणें हें कलावंत लेखकाचें ध्येय बनलें. त्याकाळीं जीवनांतील अशिव अंगांना कलावाङ्मयांत स्थान नव्हतें. चरित्रें हीं आदरभावनेनें लिहिलीं जात. त्यामुळें चरित्रवाङ्मयांत सामान्यांनाहि स्थान नव्हतें. असामान्य व्यक्तींचीं चरित्रें लिहिलीं जात. परंतु अशा व्यक्तीचें चरित्र लिहितांनाहि चरित्रविषय बनलेल्या त्या व्यक्तीमधील दोष, आणि तिच्या जीवनांतील समाजाला सर्वसामान्य-न आवडणारा, न पचणारा तपशील गाळून त्या व्यक्तीचें "गाळीव चित्रण" केलें जाई. परंतु १९१० उजाडतें, लिटन स्ट्रॅची येतो. आणि चरित्रवाङ्मया-भोंवतीं पडलेली ही चौकट हळुंहळूं पुसट होत जाते. आणि आंतील चित्राचें स्वरूप, त्याचे रंगहि पालटूं लागतात.

ह्या प्रतिक्रियेचे पहिले ध्वनि उमटतात ते लिटन स्ट्रॅचीच्या चरित्रांमधून.आणि म्हणूनच त्यानें लिहिलेल्या चरित्रांचें स्वरूप थोडेसें वेगळें उमटतें. स्ट्रॅचीचीं चरित्रें नवीन कलात्मक स्वरूपांत उमटत असतांनाच व्यक्तिसंबंधींचें सत्यदर्शन घडवितांना एका नव्या शैलीनें अवतरतात. त्याच्या लेखनपद्धतींत जुनी पारंपारिक श्रद्धा अगर उपदेशकाची वृत्ति नाहीं. परंतु त्याबरोबरच तीमध्यें एक बारीक विनोदाची छटा दिसते आणि ही लकबच जुन्या प्रवृत्तीला नव्या प्रवृत्तीपासून वेगळें काढीत जाते. हा विनोदी सूर सत्यदर्शनाला धक्का लावीत नाहीं; परंतु त्याबरोबरच जुन्या पारंपरिक कल्पनांमधील फोलपणा दर्शवितो व सर्वसामान्यपणें गाळल्या जाणाऱ्या तपशिलाचें चित्रण करीत करीत व्यक्तित्वाचें अधिक संमिश्र स्वरूपांत दर्शन घडवितो.

हा सूर पुढें फारसा दिसत नाहीं, परंतु चरित्र-वाङ्मयाचें स्वरूप मात्र कायमचें बदललेलें दिसतें. १९१० नंतर चरित्रवाङ्मय, किंबहुना, ललितवाङ्मय एक नवेंच वळण घेतांना दिसतें. लिटन स्ट्रॅची पासून पुढें चरित्रवाङ्मयाचा कल आदर्शापासून वास्तवतेकडे झुकूं लागला. ह्याचा अर्थ असा नव्हे कीं कलाविषय







होणाऱ्या आणि होऊं पाहाणाऱ्या आदर्श व्यक्तींची जागा सामान्यांनीं घेतली. तर, चरित्रविषयांकडे पाहाण्याची दृष्टिच बदलली. चरित्रविषयाला खऱ्या अर्थानें एका अनुभवाचें रूप प्राप्त होऊं लागलें. प्रत्येक व्यक्तीमध्यें एक साधारणत्व असतें. त्याबरोबरच "व्यक्ती तितक्या प्रकृति" म्हणजेच, प्रत्येक व्यक्तित्वामध्यें एक वेगळेपण असतें. असें हें संमिश्र व्यक्तित्व हाच एक अनुभव, आणि, ह्या अनुभवाचें चित्रण करणें, व तद्द्वारां त्याच्या साधारणत्वाचें व वेगळेपणाचें दर्शन घडविणें. ह्याला महत्त्व येऊं लागलें. म्हणजेच – चरित्र हें व्यक्तिजीवनचित्रणात्मक, व्यक्तिदर्शनात्मक होऊं लागलें. आणि मग आपोआपच चरित्रविषय आणि चरित्रकार यांच्यामधील हितसंबंधांचे रंगहि पालटूं लागले. चरित्राचा नायक हा जरी एखादा राजा असला तरी "मला ह्या राजा असलेल्या व्यक्तीचें चित्रण करावयाचें आहे. एक व्यक्ति म्हणून त्यांच्या स्वभावाचें–त्याच्या गुणांचें, उणीवांचें आणि दोषांचेंहि दर्शन घडविणाऱ्या त्याच्या जीवनांतील, व्यावहारिक दृष्ट्या बऱ्या अगर वाईट, समाजाला पचणाऱ्या अगर न पचणाऱ्या प्रसंगांच्या चित्रणाच्या साहाय्यानें मला त्याच्या संमिश्र व्यक्तित्वाचें दर्शन घडवावयाचें आहे," अशा वृत्तीनें कलावंतचरित्रकार चरित्रलेखन करूं लागला. आणि मग आपोआपच चरित्रलेखनाची पद्धतिहि बदलली. चरित्रनायकासंबंधींचा उपलब्ध असणारा सर्व पुरावा गोळा केला जाऊं लागला, आणि ह्या पुराव्याची निवडहि कलात्मक जाणिवेनें केली जाऊं लागली. चरित्रनायकासंबंधींच्या श्रद्धेची जागा व्यक्तिसंबंधींचें सत्य जाणण्याच्या कुतूहलानें घेतली. त्यामुळें चरित्रांतील तपशिलाची नोंद भावनावशतेनें श्रद्धेनें केली जाण्याऐवजीं काळजीपूर्वक तपासून वस्तुनिष्ठपणें केली जाऊं लागली. चरित्रविषय बनलेल्या व्यक्तीच्या जीवनांतील केवळ सामाजिक अथवा राजकीयदृष्ट्या महत्त्वाच्या अशा घटनांची क्रमवार नोंद करीत जाण्याऐवजीं तिचें व्यक्तिचित्र रेखाटण्याच्या दृष्टीनें व्यक्तित्वाचे पैलू ज्या क्रमानें लक्षांत यावेत अगर येतात त्या क्रमानें त्यांचें दर्शन घडविणाऱ्या तपशिलाचें चित्रण करणें ह्यास महत्त्व येऊं लागलें. त्याबरोबरच, चरित्रलेखन म्हणजे एका व्यक्तीच्या जीवनांतील घटनांची केवळ नोंद नव्हे, तर, त्या घटनांच्या आणि त्या व्यक्तीच्या उक्ति-कृतीमधील बारीकसारीक लकबांच्या व तिच्या स्वभावामधील बारकाव्यांच्या साहाय्यानें केलेलें व्यक्तिदर्शन आहे ह्याचीहि एक स्पष्ट जाणीव तयार झालेली दिसते. आणि म्हणूनच, उपलब्ध तपशिलाची निवड करीत असतांना केवळ ठळक तपशिलाची निवड करण्याची वृत्ति न ठेवितां तें व्यक्तिचित्र शक्यतों संपूर्ण, संपन्न व कलात्मक करण्याच्या दृष्टीनें महत्त्वाच्या अशा, ठळक व सूक्ष्म, दोन्ही प्रकारच्या तपशिलांना महत्त्व दिलें जाऊं लागलें. आणि ह्या सर्व गोष्टींमुळें चरित्राला जें एक आदर्शवादी, साचेबंद, आभासात्मक, साधनरूप स्वरूप प्राप्त झालें होतें तें हळुंहळुं कमी होऊन, तें व्यक्तिचित्रणात्मक, सत्यदर्शनात्मक आणि कलात्मक अशा स्वरूपांत निर्माण होऊं लागलें.

## चरित्रकारावरील बन्धनें

बखरवाङ्मय आणि ऐतिहासिक कादंबरी ह्याप्रमाणेंच चरित्र हाहि ललित आणि ललितेतर वाङ्मय यांच्या सीमारेषेवर असलेला एक वाङ्मयप्रकार आहे. आणि म्हणूनच त्याच्या स्वरूपासंबंधी विचार करीत असतांना अनेक प्रश्न निर्माण होतात.

चरित्र हें अंतिमदृष्ट्या जीवनचित्रणात्मक, व्यक्तिदर्शनात्मक असतें. त्यामुळें तें कादंबरीच्या खूपसें जवळ जातें–परंतु तें त्यामध्यें मिसळून मात्र कधीच जाऊं शकत नाहीं. कादंबरीमधील व्यक्ति ही कलावंताची निर्मिति असते, नवनिर्मिति असते. आणि एकदां तिला निर्माण केल्यावर तिच्या प्रकृतीला अनुरूप अशी कोणत्याहि प्रकारची व्यक्ति किंवा कृति करण्याची मोकळीक कलावंतानें तिला दिलेली असते. एकदां तें वास्तव व त्या वास्तवामधील ती व्यक्ति निर्माण केली कीं कादंबरीकार स्वतः त्या खेळापासून बाजूला होतो आणि त्या व्यक्तीच्या त्या सृष्टीमधील व्यक्तिकृतींच्या चित्रणाद्वारें तो तिच्या जीवनाचें आणि पर्यायानें त्या व्यक्तीचें दर्शन घडवीत असतो. ही त्या नवनिर्मित सृष्टीला आणि तीमधील व्यक्तींना कोणतेंहि स्वरूप आंतर आणि बाह्य देण्याची जी एक मोकळीक त्याला असते, ती चरित्रकाराला मात्र नसते. कारण ज्या व्यक्तीचें चरित्र लिहावयाचें ती एकवेळ जीवनांत प्रत्यक्ष वावरलेली असते, एका विशिष्टकाळीं एका विशिष्ट प्रकारानें ती जीवन जगलेली असते, आणि ह्या सर्वांचा







एक विशिष्ट परिणामहि होऊन गेलेला असतो. आणि ह्या घडलेल्या किंवा घडणाऱ्या घटनामध्यें फेरफार न करणें, ती व्यक्ति न बदलणें, सत्याला धक्का न लाविणें ही त्याची नीति असते, हें त्याचें आद्य-कर्तव्य असतें. आणि म्हणूनच, तिच्या व्यक्तित्वाला किंवा जीवनाला यत्किंचितहि धक्का न लावितां त्यांचें चित्रण करण्याचें एक अत्यंत महत्त्वाचें आणि जबाबदारीचें बंधन त्याच्या कल्पनाशक्तीवर असतें आणि तरीहि सत्याच्या जोडीला कलात्मक सौंदर्य आणणें अशक्य आहे असें मात्र म्हणतां येणार नाहीं. एखादें निसर्गचित्र चितारीत असतांना मूळ दृश्याला धक्का न लावितां, त्याचें रमणीयत्व सांकळूं न देतां चित्रकार त्या दृश्यामधील तपशिलाची निवड करून त्यांच्या चित्रणाद्वारें एकाचवेळीं सत्यावर कलात्मकतेचे रंग चढवीत असतो. त्याचप्रमाणें एकाचवेळीं सत्यदर्शनात्मक व कलात्मक चरित्र लिहिणेंहि अशक्य नाहीं.

## कोणत्याहि व्यक्तीचें चरित्र – लिहितां येईल काय ?

कांहींचें व्यक्तित्व किंवा जीवन हें निसर्गतःच सुंदर असतें. येथें " सौंदर्य " म्हणजे केवळ " दृश्य रमणीयत्व " असा अर्थ नव्हे. सौंदर्य हें ज्या एका पद्धतीनें जीवनाचा आस्वाद घेतला त्यामध्यें आहे. सौंदर्य जीं मूल्यें, ध्येयें मनाशी बाळगलीं त्यामध्यें आहे, सौन्दर्य कर्तृत्वांत आहे, सौन्दर्य दुःखांतहि आहे, --मनाच्या आणि जीवनाच्या प्रत्येक व्यवहारांमध्यें सौंदर्य आहे– असूं शकतें. ह्या दृष्टीनें, कांहींचें व्यक्तिमत्त्व किंवा जीवन हें निसर्गतःच सुंदर असतें. त्यांत एकप्रकारची आकर्षकता असते. परंतु येथें एक प्रश्न सहजच मनांत येऊन जातो कीं चरित्र सुंदर–श्रेष्ठ होण्यासाठीं त्यामध्यें कुतूहलविषय होऊं पाहणारी व्यक्ति आणि तिचें जीवन मुळांत सुंदर असणें आवश्यक आहे काय ? म्हणजेच, ती व्यक्ति असामान्य व्यक्तित्वाच्या दृष्टीनें असामान्य–किंवा तिचें जीवन वैचित्र्यपूर्ण असणें आवश्यक आहे काय ?

तसें पाहिलें तर चरित्र हें कोणत्याहि व्यक्तीचें लिहितां येईल. परंतु येथें ' चरित्र ' म्हणत असतांना एकाचवेळीं सत्यदर्शनात्मक व कलात्मक अशा श्रेष्ठ चरित्राची कल्पना अभिप्रेत आहे. मग, कोणत्याहि व्यक्तीचें लिहिलेलें चरित्र खऱ्या अर्थानें चरित्र होईल काय ? येथें एका वाङ्मयीन सत्याची आठवण होते. " Whatever an artist toucher becomes gold. " हें जर खरें असेल तर कलावंतानें लिहिलेलें मग तें कोणत्याहि व्यक्तीचें असो – चरित्र ही एक उत्तम कलाकृति व्हावी. वरवर पाहतां हें खरें वाटतें, परंतु ह्या दोहोंमध्यें एक छोटासाच पण अत्यंत महत्त्वाचा दुवा राहून जातो. कलावंताच्या प्रतिमेचा कलात्मक स्पर्श होतांच कोणत्याहि वस्तूला सरूपतेबरोबरच सुरूपताहि प्राप्त होते हें खरें आहे. परंतु, तत्पूर्वी अशा कलावंताच्या चिंतनाचा तो विषय बनायला हवा हेंहि तितकेंच खरें आहे. म्हणजेच, कलेची किमया घडण्यापुर्वी कलावंताचें कुतूहल जागृत करण्याइतकी आकर्षकता, तेवढें सामर्थ्य त्या व्यक्तिमत्त्वाच्या ठिकाणीं असणें आवश्यक आहे. नाहींतर त्या व्यक्तीचें तें चरित्र निव्वळ तांत्रिक होईल. कारण, जोपर्यंत कलावंत कलाविषयाच्या चिंतनांत रंगून जात नाहीं. तोपर्यंत त्यानें केलेलें त्या विषयाचें चित्रण हें खऱ्या अर्थानें चित्रण होणारच नाहीं; त्यांत जिवंतपणाहि येणार नाहीं. तो त्या व्यक्तीच्या जीवनाचा साधा इतिहास होईल ! आणि म्हणूनच कोणत्याहि व्यक्तीचें चरित्र हें कलात्मकतेचे रंग धारण करूं शकणार नाहीं. मग ही आकर्षकता कोणत्या स्वरूपाची असावी ?

आज तरी आपण चरित्राचा नायक हा सामाजिक, राजकीय किंवा धार्मिक दृष्ट्या अलौकिक असामान्य असावा असा अट्टाहास धरणार नाहीं. चरित्र नायकामध्यें कलावंताचें कुतूहल जागृत करण्याचें सामर्थ्य, ती आकर्षकता असावी असें जेव्हां आपण आज म्हणतो तेव्हा जी एक आकर्षकता अभिप्रेत असते ती त्या व्यक्तीच्या व्यक्तिमत्त्वाची, एक व्यक्ति म्हणून असलेल्या तिच्या वेगळेपणाची, त्या व्यक्तिमत्त्वामधील वैचित्र्याची आणि तदनुषंगानें येणाऱ्या तिच्या जीवनामधील वैचित्र्याची..

येथेंच वर उल्लेखिलेला आणखी एक प्रश्न निर्माण होतो. कलावंताचें कुतूहल जागृत करण्यासाठीं व्यक्तित्वांत किंवा व्यक्तिजीवनांत वैचित्र्य असणें आवश्यक आहे काय ? चाकोरींतून चालणारी व्यक्ति ही कुतूहल विषय होऊं शकणार नाहीं काय ? समजा, अशी एक व्यक्ति आहे कीं ती पहिल्यापासून शेवटपर्यंत चाकोरीतूनच गेली. चाकोरीमधून बाहेर पडण्याची तिने कधी








घडपड केली नाहीं, कोणी बाहेर काढूं पाहिल्यास चाकोरींतून बाहेर निघण्याची इच्छाहि दर्शविली नाहीं, आपण चाकोरींतून वाहात चाललों आहोंत ह्याची तिला कधीं खंत वाटली नाहीं, किंबहुना आपण चाकोरीमधून वाहात चाललों आहोंत हें जाणून घेण्याचीहि इच्छा नाहीं. आणि त्याच्या ह्या चाकोरीमधून चालत जाण्याच्या वृत्तीनेंच जर एखाद्या कलावंताचें कुतूहल जागृत झालें तर त्यामधून चरित्र निर्माण होणें शक्य आहे काय ?

अशा वृत्तीमुळें कलावंताचें कुतूहल जागृत होईल. परंतु ह्याचा अर्थ तें चरित्र उत्कृष्ट होईलच असें नाहीं. प्रत्येक व्यक्तीचे प्रकट आणि अप्रकट असे मनाचे दोन प्रवाह असतात. ती चाकोरीमधून चालणारी व्यक्ति बाहेरून निर्विकार वाटत असली तरी असें कांहींतरी तिनें अनुभविलें असेल, किंवा अशी कांहीं एका वेगळ्याच स्वरूपाची तिची प्रकृति असेल कीं ज्यामुळें वरवर पाहातां ती व्यक्ति तशी वाटते. परंतु तिच्या अंतर्मनांत नाना विचार-प्रवाह उलटेसुलटे वाहात असतील. परंतु कांहीं कारणांसाठीं किंवा कांहीं संस्कारांनीं अशा विशिष्ट प्रकारें कुठें बनलेलें त्याचें व्यक्तित्व तें प्रकट करीत नसेल, व्यक्त करीत नसेल, कोणालाहि दाद लागूं देत नसेल; आणि हेंच त्या व्यक्तीचें खरें व्यक्तित्व आहे. वरवर दिसणारा, चाकोरींतून जाणारा संथपणा हा त्याच्या व्यक्तित्वाचा खरा रंग नव्हे. आणि म्हणूनच त्याच्या अंतर्मनाचें चित्रण हेंच खरें व्यक्तिदर्शन होईल. हें शक्य आहे, पण त्याला एकच मार्ग आहे. तो म्हणजे त्याच्या अंतर्मनाचा थांग लाविणें. आणि ह्या अंतर्मनाचें चित्रण करावयाचें असेल तर तें ज्या उक्ति व कृतींमधून सूचित होतें त्यांचें चित्रण करणेंहि आवश्यक आहे. परंतु त्या व्यक्तीनें जर आपलें मन कधींच प्रकट केलें नाहीं, तर हा थांग लावायचा कसा ? ह्याला एकच मार्ग आहे. तो म्हणजे कलावंतानें कल्पनेनें हें सारें जाणून घेणें, कल्पनेनें तें मन, व्यक्तित्वाचे ते पैलू ज्या घटनांमधून व उक्तिकृतींमधून व्यक्त होतील त्यांची निर्मिति व चित्रण करून त्यामधून त्या व्यक्तित्वाचें दर्शन घडविणें. अशारीतीनें केलेलें व्यक्तिदर्शन हें कलात्मक होईल. परंतु तें 'एक व्यक्तिदर्शन' म्हणून, 'त्या व्यक्तीचें चरित्रात्मक दर्शन' म्हणून नव्हे. म्हणजेच ज्याक्षणीं कलावंताची कल्पनाशक्ति कार्य करूं लागते त्याक्षणीं त्या तथाकथित चरित्रामध्यें पुराव्यानें सिद्ध न झालेला, किंबहुना सिद्ध होऊं न शकणारा काल्पनिक - तो कदाचित् सत्य असेलहि, परंतु आहेच असें म्हणतां येणार नाहीं, कारण तो पुराव्यानें सिद्ध नाहीं — असा भाग येऊं लागतो आणि म्हणूनच तें चरित्र हें चरित्र न राहातां कादंबरी होईल! म्हणजेच, चाकोरींतील व्यक्तीचें व्यक्तिमत्त्व, तिचें जीवन हें एका श्रेष्ठ कादंबरीला जन्म देऊं शकेल परंतु अट्टाहासानें अशा व्यक्तीचें चरित्र लिहावयाचें ठरविलें, एकतर तें चरित्र-सत्यदर्शनात्मक चरित्र होणार नाहीं, नाहींतर त्या व्यक्तीच्या अत्यंत संथ व नीरस जीवनामधील वेगळेपण नसलेल्या अंगांचें वर्णन करणाऱ्या घटनांची नोंद होईल, सत्यदर्शनात्मक, परंतु इतिहास-सदृश, चरित्र होईल. आणि म्हणूनच, शेवटीं असें लक्षांत येतें कीं चरित्रविषयक होऊं पाहणारें व्यक्तिमत्त्व हें अल्पसंतुष्ट, संथ, चाकोरींतून वाहात जाणारें नसावें. त्यामध्यें चैतन्य पाहिजे, कांहींतरी करीत राहाण्याची धडपडी वृत्ति पाहिजे, मग तें धीरोदात्त असो, अधःपाताकडे ओढलें जाणारें असो, शंकरमामंजी सारखें असो, नाहींतर विचित्र-चमत्कारिक असो. जोपर्यंत कलावंताचें मन आकर्षून घेण्याची, त्याचें कुतूहल जागृत करण्याची शक्ति त्या व्यक्तिमत्त्वांत नाहीं. आणि एकदां जागृत केलें तर त्या कुतूहलाचें समाधान करण्याची शक्ति तिच्या प्रकट जीवनांत नाहीं तोपर्यंत तिचें चरित्र जिवंतपणा धरणार नाहीं, कलात्मक होणार नाहीं; तें नीरस होईल. तो त्या व्यक्तीच्या जीवनाचा इतिहास- साधा इति + ह + आस- होईल !

अशा व्यक्तिमत्त्वाचें चित्रण तिच्या जीवनाचें दर्शन हें एकाच बाबतींत सत्यदर्शनात्मक आणि कलात्मक चरित्र होण्याची शक्यता आहे. आणि तें म्हणजे अशा व्यक्तीनें लिहिलेलें आत्मचरित्र ! परंतु ह्या प्रश्नाचा विचार करीत असतांना आपण चरित्रापासून थोडे वेगळे आत्मचरित्राकडे येतों तेव्हां हा मुद्दा येथेंच ठेऊन आत्मचरित्राचा विचार करीत असतांना पुढें पुन्हा उचलून धरल्यास अप्रस्तुत होईल असें वाटत नाहीं. तेव्हां आतां आपण चरित्राच्या पुढील अंगाकडे वळूं या.








## तपशिलाच्या योजनेंतलें तारतम्य

एखाद्या व्यक्तीचें चरित्र लिहावयाचें म्हणजे तिच्या-संबंधींची सर्व प्रकारची माहिती मिळविणें हें तिच्या चरित्रकाराचें आद्यकर्तव्य होय. परंतु तेवढयानेंच भागत नाहीं. एखाद्या व्यक्तीचें चित्र काढायला बसलेला एखादा चित्रकार त्या व्यक्तीच्या डोक्यावरील प्रत्येक केस आणि चेहेऱ्यावरील प्रत्येक सुरकुती काढीन म्हणाला तर तें चित्र इतकें किचकट होईल कीं त्यामधील रेषांच्या जाळयामध्यें त्या व्यक्तीचें व्यक्तिमत्त्व लपून जाईल. त्यानें भरलेल्या तपशिलाच्या गोंधळांत तिचें व्यक्तित्व पार लोपून जाईल. तेंच, त्या व्यक्तीचें व्यक्तिमत्त्व ज्या अंगप्रत्यंगांमधून प्रत्ययास येतें; केवळ त्यांचेंच चित्रण करून त्या चित्रकारानें चित्र काढिलें तर मात्र तें चित्र हें खरोखरच श्रेष्ठ ठरण्याची शक्यता निर्माण होईल. तीच गोष्ट चरित्राची! उपलब्ध असणाऱ्या सर्व तपशिलाची नोंद म्हणजे चरित्र नव्हे. चरित्रलेखनामध्यें व्यक्तिदर्शन घडविण्याच्या दृष्टीनें उपलब्ध तपशिलाची निवड करणें व त्यांच्या साहाय्यानें व्यक्तीच्या भावनात्मक आणि आत्मिक विकासाचें सुसंगतपणें चित्रण करणें ह्या दोन गोष्टींना अत्यंत महत्त्व आहे. नाहींतर पुनरावृत्ति आणि भारूड यामुळें त्यामधील स्वारस्य निघून जाईल. परंतु ही निवड करीत असतांनादेखील बारीकसारीक तपशिलाकडे दुर्लक्ष होऊं न देण्याची खबरदारी घेणें अत्यावश्यक आहे. अमूक एक धीरोदात्त, अमूक एक सनातनी, अमूक एक राजकारणी अशाप्रकारें व्यक्तीच्या ठिकाणच्या साधारणधर्माचें चित्रण करून व्यक्तींचें केवळ ढोबळ वर्गीकरण करणें हें कलेचें कार्य नव्हे. ह्या साधारणधर्माखेरीज तिच्या ठिकाणीं असें कांहींतरी असतें कीं त्यामुळें ती इतरांहून वेगळी पडत असते. आणि ह्या वेगळेपणावर तिच्यामधील अनन्यसाधारणत्वावर नेमकें बोट ठेऊन तिच्या खऱ्या व्यक्तित्वाचें नेमकें दर्शन घडविणें हें कलेचें कार्य होय हें जें त्या व्यक्तीचें वेगळेपण तें इतकें सूक्ष्म असतें कीं तें व्यक्तीच्या व्यक्तिकृतीमधील बारीकसारीक लकबी, तिच्या वागण्याच्या विशिष्ट पद्धति यामधून अत्यंत सूक्ष्मपणें, सूचकतेनें व्यक्त होत असतें. आणि म्हणूनच, जोपर्यंत चरित्रकार तपशिलाची निवड करीत असतांना ही सूक्ष्म दृष्टि ठेवणार नाहीं तोपर्यंत व्यक्तीच्या खऱ्या व्यक्तिमत्त्वाचें नेमकें दर्शन घडणार नाहीं.

कांहींवेळां चरित्रांमधून असेंहि दिसून येतें. चरित्रविषय बनलेल्या व्यक्तीच्या सामाजिक जीवनांत प्रतिष्ठा पावलेल्या व्यक्तीशीं कोठेंतरी संबंध आलेला असतो. किंवा त्या व्यक्तीचा ऐतिहासिकदृष्टया महत्त्वाच्या अशा कांहीं घटनांशीं थोडाबहुत संबंध आलेला असतो. आणि त्या व्यक्ति किंवा त्या घटना समाजाला म्हणजेच सामान्य वाचकाला आणि स्वतः चरित्रकाराला महत्त्वाच्या वाटतात म्हणून त्या चरित्रामध्यें त्यांना वाजवीपेक्षां अधिक महत्त्व दिलेलें असतें. परंतु त्यांचें परिशीलन करीत असतांना आपल्या लक्षांत येतें कीं त्यामुळें त्या लेखनकृतींत एक चरित्र म्हणून दोषच निर्माण होतो. आणि म्हणूनच इतर कोणत्याहि दृष्टीनें त्या व्यक्तीच्या जीवनाशी संबंधित अशा व्यक्तींना किंवा घटनांना कितीहि महत्त्व असलें तरी जोपर्यंत चरित्र हें चरित्रविषय झालेल्या व्यक्तीच्या व्यक्तिमत्त्वाचें आणि जीवनाचें दर्शन घडविण्यासाठीं आहे, तोपर्यंत चरित्रांत त्या व्यक्तीला आणि तिच्या व्यक्तिदर्शनाच्या दृष्टीनें महत्त्वाच्या अशा तिच्या जावनांतील आणि तिच्या जीवनाशीं संलग्न असणाऱ्या घटनांनाच केवळ प्राधान्य देणें इष्ट आहे. चरित्रामध्यें इतिहासानें पार्श्वभूमि सोडून पुढें येण्यानें व्यक्ति बाजूला पडेल आणि चरित्र इतिहास होईल! चरित्रामध्यें चरित्रकाराच्या व्यक्तिनिष्ठेला एका मर्यादेपलीकडे वाव नसतो. व्यक्तीच्या जीवनांतील ज्या अंगप्रत्यंगांमधून तिच्या विकसित होत जाणाऱ्या व्यक्तिमत्त्वाचें, विविध पैलूंचें व जीवनाचें चित्र त्याच्या प्रत्ययाला येतें त्यांच्या निवडीपुरतीच ती मर्यादित असते. एकदां ही प्रक्रिया संपली कीं व्यक्तिनिष्ठा संपली मग वस्तुनिष्ठेला, आणि एका वस्तुनिष्ठेलाच प्राधान्य येतें.

ललितवाङ्मयाप्रमाणेंच चरित्रलेखनांतहि कलावंत-लेखकाच्या आत्मविस्मृतीला—स्वभावविस्मृतीला अत्यंत महत्त्व आहे. कादंबरीकाराप्रमाणेंच व्यक्तिमनाचें आणि तिच्या जीवनाचें दर्शन घडविणें हेंच चरित्रकाराचेंहि साध्य असतें. परंतु व्यक्तीला आदर्श बनविण्यासाठीं, किंवा स्वतःला योग्य वाटतें म्हणून कोणतीहि एखादी गोष्ट मग ती चांगली असो अगर वाईट – त्या व्यक्तीवर लादण्याचा प्रयत्न चरित्रकार करूं लागला तर त्या








व्यक्तीवर अन्यायच होईल. चरित्रकारानें आपल्या दृष्टिकोणामधून व्यक्तीचें आणि तिच्या जीवनाचें चित्रण केलें तर कदाचित् ती एक श्रेष्ठ कादंबरी होईल, परंतु चरित्र कितपत होईल ह्याबद्दल शंकाच आहे !

ही झाली चरित्राकडे पाहाण्याची चित्रणात्मक, दर्शनात्मक निखळ कलात्मक दृष्टि. ह्याप्रमाणेंच सामाजिक, ऐतिहासिक, तात्त्विक, वैद्यकीय इत्यादि अनेक दृष्टींनीं चरित्र ह्या शाखेकडे पाहातां येईल; नाहीं असें नाहीं. परंतु अशा वृत्तीनें लिहिलेल्या चरित्रांमागील मूळ प्रेरणेंतच अंतर असल्यानें त्यांचें स्वरूपहि तसेंच माहितीपर, ललितेतर होईल. ललितवाङ्मय आणि शास्त्रीय लेखन ह्यांचीं क्षेत्रेंच भिन्न—जवळ जवळ परस्पर विरोधीच आहेत. त्यांचीं मूल्येंहि तशींच वेगळीं आहेत. आणि ज्यावेळीं हे दोन भिन्न लेखनप्रकार एकमेकांच्या क्षेत्रांत प्रवेश करितात तेव्हां त्यांचें त्यादृष्टीनें असणारें मूल्य हें आपोआपच घटतें. ह्याच न्यायानें, ज्याप्रमाणांत चरित्र हें शास्त्रीय स्वरूपांत अवतरत जाईल त्याप्रमाणांत एक शास्त्रीय साधन म्हणून त्याला थोडेंफार महत्त्व प्राप्त झालें तरी त्याप्रमाणांत त्यामधील कलात्मकतेला निश्चितपणें बाध येईल. आणि शास्त्रीय साधन ह्या दृष्टीनें ललितेतर स्वरूप त्याला प्राप्त होईल !

चरित्रामधून सत्यदर्शन घडतें. परंतु येथेंच एक प्रश्न निर्माण होतो, कीं चरित्रामधील सत्य हें शास्त्रीय सत्य असतें काय ? ह्या प्रश्नाचे दोन भाग पडतात.

(१) व्यक्तिसंबंधीचें अबाधित सत्य समजणें शक्य आहे काय ? आणि—

(२) व्यक्तीच्या जीवनाचें चित्रण केलें तर त्यामधून त्या कालासंबंधींची माहिती कितपत मिळूं शकेल ?

आपण प्रथम पहिल्या प्रश्नाकडे वळूं. व्यक्तीसंबंधींचें सत्य समजणें शक्य आहे. ह्या प्रश्नाचा विचार करण्यापूर्वी व्यक्तीसंबंधींच्या सत्याचा मागोवा घेण्यासाठीं जीं साधनें आपण मानतों तीं कितपत विश्वासार्ह आहेत ह्याचा विचार करणें उचित होईल.

चरित्रविषय बनलेल्या व्यक्तीची दैनंदिनी हें एक अत्यंत महत्त्वाचें साधन मानलें जातें. दैनंदिनी म्हणजे तिच्या लेखकाच्या जिवाभावाची मैत्रीण ! आपल्या अगदीं मनांतलें गुपितहि तो तिच्यापाशीं व्यक्त करीत असतो. दैनंदिनीमधूनच व्यक्तीच्या मनाचें प्रकट व अप्रकट अंतःप्रवाहाचें एकाचवेळीं सुसंगत व स्पष्ट असें दर्शन घडण्याची शक्यता असते. आणि म्हणूनच दैनंदिनीमधून व्यक्तिमनाच्या कंगोऱ्यांचें, तिच्या भावनात्मक व आत्मिक विकासासहित तिच्या व्यक्तिमत्त्वाचें स्पष्टपणें दर्शन घडण्याची शक्यता असते. परंतु येथेंहि एक धोका संभवतो. कित्येकदां प्रत्यक्ष जीवनांत कांहीं गोष्टी साधण्यासाठीं म्हणा, किंवा इतर कोणत्या उद्देशानें म्हणा, दैनंदिनी लेखन किंवा इतर खाजगी पत्रव्यवहार वगैरे स्वरूपाचें लेखन हें हेतुपूर्वक एका विशिष्टप्रकारें केलें जाण्याची शक्यता असते. परंतु अशावेळीं दैनंदिनीचें लेखन हें प्रांजळपणें झालें आहे कीं नाहीं, तिच्यामध्यें व्यक्तिमनाचें निर्मळ, अकलुषित प्रतिबिंब उमटलें आहे किंवा नाहीं इत्यादि नोंदल्या गेलेल्या तपशिलाचें सत्यासत्यत्व जाणण्यास दुसरा मार्ग नसल्यामुळें, त्याची इतर पुराव्याशीं आणि त्या व्यक्तीच्या व्यक्तिमत्त्वाचें जें एक चित्र आपल्या मनावर उमटलें आहे, त्याच्याशीं तुलना करून त्याची संगति लाविली तरच, कांहीं पुरावा किंवा नोंदलेला तपशील हा फसवा असला तरी त्या पुराव्यान्वयें त्या व्यक्तिमनाच्या, आपल्याला न आवडणाऱ्या कां होईना, पण एका नव्या अंगावर प्रकाश पडण्याची शक्यता निर्माण होईल, आणि तें व्यक्तिदर्शन अधिक सकस, संपूर्ण व समृद्ध होईल. परंतु अशावेळीं कल्पनाशक्तीलाच अधिक प्राधान्य येतें, कारण तर्कानुमानांना सत्याची अचूक दिशा दाखविण्याचें कार्य कल्पनाशक्ति करीत असते. आणि म्हणूनच, दैनंदिनीच्या संदर्भांतहि तपशिलाची पारख करण्याची ही काळजी घेतली नाहीं तर दिशाभूल होण्याची शक्यताच अधिक !

## कलावंताच्या कलाकृतींचा — साधन म्हणून उपयोग !

सर्वसामान्यपणें असें दिसून येतें कीं चरित्रविषय बनलेली व्यक्ति जर एक कलावंत असेल तर तिनें निर्माण केलेल्या कलाकृतींमधून त्या व्यक्तिमनाचा शोध घेण्याचा प्रयत्न केला जातो. परंतु ह्या साधनानेंहि पुष्कळदां दिशाभूलच होते. कलाकृतीमधून अधूनमधून कलावंत डोकावतो हें खरें आहे. परंतु कलाकृतीमधील प्रत्येक तपशील कलावंताच्या व्यक्तित्वाचा द्योतक आहे असा अट्टाहास करणें मात्र अत्यंत धोक्याचें आहे.

ललितवाङ्मयच किंबहुना ललितकलावाङ्मयच हें व्यक्तिनिष्ठ असतें, आत्मनिष्ठा हा त्याचा एक गुण आहे हें खरें. परंतु ह्या व्यक्तिनिष्ठेचें स्वरूप दोन प्रकारांनी दिसतें. कलावंत हा अनेकदां स्वतःचा अनुभव अभिव्यक्त करीत असतो हें खरें, परंतु कलावाङ्मयांतून आविष्कृत होणारा प्रत्येक अनुभव कलावंतानें स्वतः त्याच्या जीवनांत अनुभविलेला असतोच असें नाहीं. अनुभव हा त्याचा स्वतःचा असून त्याला त्यामधून जें जाणवलें त्याची अभिव्यक्ति करण्यासाठीं ज्याप्रमाणें कलाकृतीची निर्मिति होते. त्याचप्रमाणें दुसऱ्यांचे अनुभव, कित्येकदां कल्पनेनें घेतलेले अनुभव हेहि त्याच्या कुतूहलाचे, चिंतनाचे विषय होऊं शकतात. आणि अशावेळीं, प्रत्यक्ष जीवनांत त्याचे नसलेले, किंबहुना प्रत्यक्ष जीवनांत न घडलेले असे हे अनुभव कल्पनेनें त्याचे होतात, आणि ह्या चिंतनामधून कल्पनाशक्तीच्या साहाय्यानें त्यांचा अनुभव घेत असतांना जी एक अनुभूति त्याला येते तिची अभिव्यक्ति करण्यासाठीं जेव्हां तो त्या भावानुभवाचें चित्रण करूं लागतो तेव्हांहि एक श्रेष्ठ कलाकृति निर्माण होऊं शकते. कल्पनेनें त्या अनुभवाचा आस्वाद घेत असतांना त्या अनुभवाचें जें एक वास्तवरूप त्याला दिसतें त्याचें तो आपल्या दृष्टिकोणामधून आपल्या पद्धतीनें चित्रण करीत असतो. आणि म्हणून आपण म्हणतो कीं हें व्यक्तिनिष्ठ आहे. ह्या दोन रूपांनीं कलावाङ्मय हें व्यक्तिनिष्ठ असतें. येथें आत्मनिष्ठा ह्या शब्दाचा हा विशिष्ट अर्थ लक्षांत घेतला तर आपल्या लक्षांत येईल कीं प्रत्येक कलाकृति ही व्यक्तिनिष्ठ असली तरी ती कलावंताच्या आत्मजीवनांतील अनुभवाचेंच चित्रण करिते असें नाहीं. त्याचप्रमाणें त्यानें निर्माण केलेली प्रत्येक व्यक्ति ही एक नवनिर्मिति असते, ती त्याच्या व्यक्तित्वानें घडविलेली असते हें जरी खरें असलें तरी वाङ्मयीन कृतीच्या निर्मितीत कलावंताच्या स्वभावविस्मृतीचें तत्त्व हें आहेच. आणि म्हणूनच त्यानें निर्माण केलेली प्रत्येक व्यक्ति ही जोपर्यंत एक नवनिर्मिति आहे, अपूर्ववस्तु आहे तोपर्यंत तिच्या रूपांत कलावंताच्या मनाचे रंग शोधणें हें नेहमीच उपकारक ठरेल असें नाहीं. उलट एकंदरीत पाहातां असेंच दिसतें कीं कलावाङ्मयांत आत्मचरित्रात्मक भाग हा फार कमी प्रमाणांत आढळतो कलावंताचें कांहीं वृत्तींच्या बाबतींत त्या सृष्टीशी व तिच्यामधील जीवनाशीं साम्य असलें तरी अखेर ती एक नवनिर्मिति असते– अपूर्ववस्तु असते आणि ती कलाकृति म्हणजे कलावंताच्या प्रतिभेनें निर्माण केलेल्या कांहीं व्यक्तींच्या त्या वास्तवामधील जीवनाला आलेल्या रूपाचें चित्रण असतें. आणि म्हणूनच हें लक्षांत न घेतां कलाकृतीमधील प्रत्येक तपशिलामधून कलावंताचें व्यक्तित्व पाहाण्याचा अट्टाहास करण्यानें दिशाभूल होण्याची शक्यताच अधिक !

व्यक्तीच्या समकालीनांच्या आठवणी हेंहि एक महत्त्वाचें साधन मानलें जातें. परंतु ह्या आठवणीचें लेखनहि नेहमींच अविकृत स्वरूपांत झालेलें असतेंच असें नाहीं. कित्येकदां त्या स्वतःच्या एका वेगळ्या दृष्टिकोणामधून लिहिलेल्या असतात, तर कित्येकदां ह्या आठवणींना 'साहित्यिक' स्वरूप देण्याचा प्रयत्न केलेला असतो. हें कसें घडतें ह्याचें उत्तम उदाहरण म्हणून पु. ल. देशपांडे यांच्या आठवणी "साहित्यिक आणि प्रामाणिक" ह्या 'आठवणी' लेखनांतील खोटेपणाचें विडंबन करणाऱ्या लेखाकडे पाहातां येइल. म्हणजेच, ह्याहि संदर्भांत तुलना, पारख आणि निवड ह्या गोष्टींना महत्त्व येतें.

व्यक्तिमन हें संमिश्र स्वरूपाचें आहे. आणि म्हणूनच तें अगम्य आहे. तें जितकें व्यक्त होतें-दिसतें, त्याहूनहि अधिक तें सूचित होतें-जाणवतें. उपलब्ध पुराव्याच्या चित्रणानें त्याचा पुरा थांग लावणें कठीण आहे. त्यांतूनहि संगति लावितां येईल. परंतु ज्या साधनांव्दयें ही संगति लावायची तीहि त्यामानानें कितीतरी दुबळीं ! त्यामुळें अशाप्रकारचें चरित्रामधील सत्य हें एखाद्या नवीन व विश्वसनीय पुराव्याच्या उपलब्ध होण्यानें किंवा जुन्या पुराव्यामधील असत्यत्व लक्षांत येण्यानें बदलण्याची शक्यता असते. आणि म्हणूनच, चरित्रवाङ्मयांतील सत्य हें शास्त्रीय सत्याच्या कसोटीला उतरूं शकत नाहीं–त्यामध्यें कांहींतरी अंतर हें राहून जातेंच !

**व्यक्तीच्या जीवनचित्रावरून –**
**काळावर प्रकाश पडतो काय ?**

ह्यानंतर दुसरा प्रश्न–व्यक्तीचें जीवनचित्र त्या काळावर कितपत प्रकाश टाकूं शकेल ?







वस्तुतः चरित्र आणि इतिहास—राजकीय किंवा —सामाजिक—यांच्या पद्धतीच मुळांत वेगळ्या आहेत. इतिहासांत कालाला व्यक्तींच्या लौकिक जीवनाला महत्त्व असतें. त्यामुळें इतिहासांत ऐतिहासिकदृष्ट्या राजकीय व सामाजिकदृष्ट्या महत्त्वाच्या अशा घटनांना आणि त्या घटनांना जबाबदार असणाऱ्या व्यक्तींनाच केवळ स्थान असतें. किंबहुना इतिहासांत व्यक्तींच्या राजकीय व सामाजिक जीवनालाच केवळ स्थान असतें असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं. त्यांचे खाजगी प्रश्न व व्यक्तिगत जीवन यांच्याशीं इतिहासाला कर्तव्य नसतें. क्वचित् असतें, परंतु जेव्हां व्यक्तीचें खाजगी जीवन हें सामाजिक वा राजकीय डावपेचांचाच एक भाग बनतें तेव्हां आणि तेंहि त्या तेवढ्याच भागाशीं ! इतिहासांत शिवाजी येतो तो एक राजकारणी पुरुष म्हणून, एक संस्कृतिरक्षक-धर्मरक्षक म्हणून त्याचें व्यक्तिगत जीवन काय होतें, कसें होतें वगैरे गोष्टींना इतिहासांत स्थान नाहीं. त्याउलट, चरित्रांत इतिहास हा व्यक्तिचित्रणाच्या पार्श्वभागीं वास्तवनिर्मितीसाठीं येतो. तेथें व्यक्ति हा केन्द्रबिंदु असतो, आणि इतर तपशील, मग त्या ऐतिहासिकदृष्ट्या महत्त्वाच्या अशा व्यक्ति किंवा घटना असल्या तरी त्यांचें स्थान गौणच असतें. ह्याचाच परिणाम असा होतो कीं इतिहासांत व्यक्तिजीवनांतील केवळ स्थूल सत्यांना महत्त्व येतें. त्याउलट, चरित्र व्यक्तीच्या व्यक्तित्वामधील वैशिष्ट्यांचें चित्रण करण्यासाठीं धडपडत असतें तें एका व्यक्ती-संबंधींचें सत्य सांगतें,— आणि थोड्याबहुत प्रमाणांत तिच्या जीवनाशीं संबंधित अशा व्यक्तिसंबंधींचेंहि सत्य सांगतें. म्हणजेच, चरित्र ऐतिहासिकदृष्ट्या व्यक्ति-सापेक्ष म्हणून एक संकुचित असें सत्य सांगतें. आणि म्हणूनच चरित्र निखळ ऐतिहासिक सांगण्यास सत्य असमर्थ ठरतें. येथें पहिली मर्यादा पडते.

चरित्र हें एक ऐतिहासिक साधन होऊं शकेल. परंतु तेंहि कोणत्या प्रमाणांत हें तें चरित्र ज्या व्यक्तीचें लिहिलें तिचें त्याकाळांतील समाजांतील स्थान काय, आणि तिच्या व्यक्तित्वाचा हा भाग त्या चरित्रामध्यें कोणत्या प्रमाणांत चित्रित झाला आहे ह्या दोन गोष्टीवर अवलंबून राहील. जर तें चरित्र ज्ञानेश्वर, आगरकर, टिळक, अशा जीवनाला नवें वळण लावणाऱ्या व्यक्तींचें असेल तर त्यानें राजकीय अगर सामाजिक सत्य फार मोठ्या प्रमाणांत उजळून निघण्याची शक्यता आहे. तें चरित्र जर अशा एखाद्या व्यक्तीचें असेल कीं जिच्यावर अनेक संकटें आलीं, व ती व्यक्ति त्यांना तोंड देत देत जीवन जगली, प्रवाहांतून वाहात असतांना मध्येंच पाय टेकण्याची धडपड केली, परंतु सामर्थ्य अपुरें पडल्यामुळें अखेर तसेंच वाहात जावें लागलें; ह्या व्यक्तीमुळें जीवनौघाला नवें वळण मिळालें नाहीं म्हणून तिला इतिहासांत स्थान नाहीं, पण सामान्य राहूनहि त्यांतून बाहेर पडण्याची धडपड तिनें केली, तर, त्यानें काल-प्रवाहावर नाहींतरी तत्कालीन छोट्या छोट्या रूढी, समाजाची वृत्ति इत्यादि सत्यांवर प्रकाश पडेल. परंतु ती व्यक्ति जर अशा प्रकारची असेल कीं जिने स्वतःचें असें एक विश्व निर्माण केलें आहे व त्यांतच जिनें स्वतःला बुडवून टाकिलें आहे, तर मात्र कोणत्याहि प्रकारचें ऐतिहासिक सत्य त्यामधून व्यक्त होईलच असें सांगतांहि येणार नाहीं. म्हणजेच, चरित्रांतील व्यक्तिसापेक्ष सत्याला परिस्थिति सापेक्षतेची दुसरी मर्यादा पडते.

परंतु एखाद्या ऐतिहासिक अगर सामाजिकदृष्ट्या महत्त्वाच्या अशा व्यक्तीच्या चरित्रामधूनहि इतिहासाच्या त्या अंगासंबंधींचें व्यक्तिसापेक्ष व परिस्थिति-सापेक्ष कां होईना, परंतु एक संपूर्ण सत्य व्यक्त होईलच असें नाहीं. कारण अखेर त्या व्यक्तीचें चरित्र कोणत्या पद्धतीनें लिहिलें आहे, चरित्रकारानें व्यक्तीत्वाच्या कोणत्या अंगाला महत्त्व दिलें आहे, ह्याला महत्त्व आहेच ! एखादा चरित्रकार आगरकरांच्या स्वभावदर्शनाला महत्त्व देईल, दुसरा एखादा चरित्रकार त्यांच्या कार्याला महत्त्व देईल. आणि ह्या दोहोंत निश्चितपणें फरक पडेल. म्हणजेच चरित्रकाराच्या चरित्रलेखन ह्या प्रकाराकडे पाहाण्याच्या विशिष्ट दृष्टीमुळें चरित्रामधील सत्याला तिसरी मर्यादा पडते. आणि म्हणूनच, कोणतेंहि चरित्र हें ऐतिहासिक सत्याप्रत नेऊन पोहोंचविणारें साधन होत असलें तरी ऐतिहासिक सत्यावर प्रकाश पडण्याच्या दृष्टीनें चरित्रांतील सत्याला ( Particularness ) व्यक्तिसापेक्षता, परिस्थितिसापेक्षता, आणि चरित्रकाराची चरित्राकडे पाहाण्याची दृष्टि इत्यादि गोष्टींमुळें वेगवेगळ्या मर्यादा पडत असल्यामुळें, आणि विशेष म्हणजे ह्या मर्यादा अनिश्चित (flexible) असल्यामुळें, इतिहासाचें साधन म्हणून चरित्राचें महत्त्व

काय ह्याबाबतींत आपण निश्चित असे आडाखेहि बांधूं शकणार नाहीं.

कादंबरीमधील अनुभव हा लेखकाला आलेला एक अनुभव असला तरी कादंबरी हें व्यक्तिमनाचें, व्यक्तीच्या जीवनखंडाचें, आणि पर्यायानें एका जीवनांगाचें दर्शन घडवीत असतें. तेथें अनुभव हा कलावंताचा व्यक्तिगत अनुभव असला तरी त्यामुळें कादंबरींतील कलात्मकतेंत बाध येत नाहीं. कित्येकदां तर आपल्याला असेंहि दिसून येतें कीं कादंबरीकार हा आपल्याच वृत्तीची एक व्यक्ति एका नव्या कल्पनेच्या सृष्टींत निर्माण करून तिच्याद्वारें आत्माविष्कार करीत असतो; आणि तरीहि, एक कादंबरी म्हणून ती श्रेष्ठत्व पावूं शकते. कादंबरीप्रमाणेंच चरित्रहि एका व्यक्तिमत्त्वाचें आणि त्याच्या जीवनाचें दर्शन घडविण्याचें कार्य करीत असतें. मग कादंबरीप्रमाणेंच चरित्रकारालाहि चरित्रामधून आत्माविष्कार साधतां येईल काय? त्याच्या ज्या कांहीं वृत्ति त्याला अस्वस्थ करीत असतात तशाच स्वरूपाच्या व्यक्तीचें चरित्र लिहून त्यामधून आत्माविष्कार साधतां येणार नाहीं काय? होय, येईल! इतकेंच काय परंतु अशाप्रकारें केलेलें लेखन अत्यंत जिव्हाळयानें, व्यक्तिमन समजून–उमजून केलेलें असल्यामुळें तें अधिक जिवंत, अधिक सरस होईल. परंतु त्यालाहि एक मर्यादा राहील.

## चरित्र-लेखन व लेखकाचा आत्माविष्कार

चरित्रामधील आत्माविष्काराला मर्यादा कां पडते ह्यासंबंधी विवेचन करीत असतांना एके ठिकाणीं मोर्वा म्हणतो कीं "चरित्रविषय बनलेली व्यक्ति व चरित्रकार ह्यांच्यामध्यें कांहीं वृत्तींच्या बाबतींत साम्य असलें तरी अखेर त्या दोन वेगवेगळया व्यक्ति असतात" हें सहज मान्य होण्यासारखें आहे. परंतु त्याचें म्हणणें येथेंच संपत नाहीं तो पुढें जाऊन म्हणतो कीं, "चरित्रविषय बनलेली व्यक्ति ही चरित्रकारापेक्षां नेहमीच श्रेष्ठ असते आणि मतभेदाचा प्रश्न येतो तो येथें आजपर्यंत जीं चरित्रें लिहिलीं गेलीं जवळजवळ सर्वच चरित्रांमधून सामाजिक, राजकीय, वैज्ञानिक, वैद्यक इत्यादि क्षेत्रांमध्यें मोठें कार्य करून गेलेल्या व्यक्तींच्या जीवनाचें चित्र रेखाटलेलें आहे हें खरें. परंतु तात्त्विकदृष्टया हें म्हणणें तितकेंसें बरोबर नाहीं. कलावंत चरित्रकाराचें कुतूहल जागृत करण्याइतकी आकर्षकता व्यक्तीच्या जीवनांत किंवा व्यक्तित्वांत असली पाहिजे हें खरें आहे. परंतु जीवनांत कधीकधी असेंहि घडतें. एखादी व्यक्ति सर्वसामान्य असेल, परंतु तिची वृत्ति प्रवाहांतून केवळ वाहात जाण्याची नसेल, तर प्रवाहाच्या वेगाशीं झुंजत त्यांतच जमिनीला पाय टेकण्याची, उभे राहाण्याची तिची धडपड असेल. परंतु तिचें सामर्थ्य कमी पडल्यामुळें अखेर मनाविरुद्ध कां होईना पण त्या व्यक्तीला त्या प्रवाहांतून वाहात जावें लागलें असेल, अशावेळीं त्या व्यक्तीच्या धडपडीमुळें त्या प्रवाहावर डोळयांत भरण्याजोगा, चिरंतन अशा स्वरूपाचा कोणताच परिणाम होणार नाहीं. आणि म्हणूनच प्रवाहाचें बदलतें स्वरूप आणि तें बदलण्यास जबाबदार अशा व्यक्तींचें तें कार्य ह्यांचीच केवळ दखल घेणाऱ्या इतिहासांत त्या सर्वसामान्य व्यक्तीला आणि तिच्या त्या निष्फल ठरलेल्या प्रयत्नाला स्थान मिळणार नाहीं. परंतु एखाद्या चरित्रकाराचें मन वेधून घेण्याइतकें वैचित्र्य त्या व्यक्तिजीवनांत खचितच असतें. आणि म्हणूनच, एखादा चरित्रकार जेव्हां त्या व्यक्तीचें चरित्र लिहील तेव्हां तें चरित्र वैचित्र्यपूर्ण, जिवंत व सरस होऊं शकेल. तेव्हां तात्त्विक दृष्टया चरित्रनायकाचें व्यक्तित्व हें चरित्रकारापेक्षां नेहेमींच श्रेष्ठ असतें असें मानण्याची आवश्यकता नाहीं.

ज्या कारणामुळें चरित्रांत आत्माविष्काराला मर्यादा पडते तें वस्तुतः वेगळेंच आहे. महत्त्वाची गोष्ट अशी आहे कीं, ह्या दोन व्यक्तींमध्यें कांहीं वृत्तींच्या बाबतींत साम्य असलें तरी अखेर चरित्रविषय बनलेली व्यक्ति ही चरित्रकारापेक्षां वेगळीच असते. जोपर्यंत ह्या दोन भिन्न व्यक्ति आहेत तोपर्यंत त्यांच्या व्यक्तित्वांमध्येंहि, सूक्ष्म कां होईना, पण फरक हा असणारच! आणि व्यक्तीच्या ठिकाणच्या साधारणत्वापेक्षां तिच्यामधील असाधारणत्व, तिचें वेगळेंपण चित्रित करणें ह्यांतच खरें चरित्राचें वैशिष्टय आहे, खरें व्यक्तिदर्शन आहे. चरित्रकाराचें सामर्थ्य कौशल्य आहे. आणि म्हणूनच चरित्रकाराला स्वतःची दृष्टि, स्वतःची वृत्ति, 'आपलेपण' त्या व्यक्तीवर लादून तिच्या वेगळेपणाशीं म्हणजेच पर्यायानें त्या व्यक्तिमत्त्वाशीं व्यभिचार करून चालणार नाहीं. नाहींतर, त्या व्यक्तिचित्रणांत बाध येईल, आणि ती लेखनकृति कितीहि भावनोत्कट

-संरस उतरली तरी एक चरित्र म्हणून तिच्यामध्यें उणीव राहून जाईल.

व्यक्तिमन हें संमिश्र स्वरुपाचें असतें. त्याला अनेक पैलू असतात. कित्येकदां तर कांहीं व्यक्तींच्या जीवनांत असे कांहीं प्रसंग असतात कीं त्यांचीं कारण-मीमांसा देणें केवळ अशक्यच असतें. एखाद्या व्यक्तीच्या मनांत कांहींजणांबद्दल उगीचच अढी असते, तर कांहींच्याबद्दल ओलावा असतो. आपण 'उगीचच' म्हणतों. कारण आपण त्याबद्दल कोणतीहि प्रत्यक्ष कारणमीमांसा देऊं शकत नाहीं. जर कांहीं असलेंच, तर तो त्या व्यक्तीचा स्वभाव होय, ह्यापलीकडे आपण जाऊंच शकत नाहीं. आणि अशावेळीं दोन-दोन पानें प्रवचन करण्यापेक्षां त्या प्रसंगाचें साक्षात् चित्रण करितां आलें तर त्यानेंच त्या व्यक्तिविशेषावर प्रकाश पडण्याची शक्यता अधिक! आणि असें साक्षात् चित्रण करण्यासाठीं चरित्रकाराला त्या व्यक्तिमनाच्या चिंतनांत रंगून जाणें, त्याच्याशीं समरस होऊन तें समजून घेणें अत्यंत आवश्यक आहे. आणि त्यासाठीं, त्या दृष्टीनें, ज्या व्यक्तिमनाचें चित्रण करावयाचें असेल त्याच्याशीं चरित्रकाराचें थोडेंबहुत वृत्तिसाधर्म्य असेल तर कदाचित् तो त्याचें साक्षात्, जिवंत चित्रण करून जाईलहि. परंतु ही मर्यादा ओलांडून तो जर त्या चरित्रनायकावर आपले विचार, आपल्या भावना, आपल्या वृत्ती लादूं लागला, तर मात्र कलागुणांनीं ती ललनकृति कितीहि संपन्न झाली तरी ती एक कादंबरी होईल, चरित्र नव्हे! चरित्र कलागुणांनी संपन्न झालें तर तें आपल्याला हवेंच आहे. परंतु चरित्रांत सत्यदर्शनाला प्रथमस्थान आहे. आणि म्हणूनच, चरित्रकारानें उपलब्ध पुराव्याचा विवेकानें विचार करणें अत्यंत आवश्यक आहे.

## चरित्र आणि कादंबरी

कलावंत चरित्रकाराच्या कल्पनाशक्तीवर हें जें पुराव्याचें बंधन असतें त्यामुळें चरित्र आणि कादंबरी ह्यांमधील व्यक्तिदर्शनांत एक मोठाच फरक पडतो. चरित्रविषय बनलेल्या व्यक्तीच्या तिच्या संबंधित अशा व्यक्तींनीं पाहिलेल्या किंवा नमूद करून ठेविलेल्या अंगांचें, म्हणजेच तिच्या केवळ प्रकट झालेल्या जीवनाचें दर्शन चरित्रामधून घडत असतें. परंतु व्यक्ति ही केवळ तिच्या उक्तिकृतींमध्यें नसते; ती तिच्या मनोव्यापारांत असते. तिचें अंतर्मन अत्यंत विशाल असतें, आणि त्यामध्यें अनेक सत्यें दडलेलीं असतात. ह्याची जाणीव असूनहि व्यक्तीचें अंतर्बाह्य चित्रण करणें हें चरित्रकाराच्या नीतिबाह्य असतें. परंतु कादंबरीकार ह्या अंतर्मनाचें चित्रण करूं शकतो. त्यामुळें, कादंबरीमधील व्यक्ति ही संपूर्णपणें प्रत्यक्षांतील, केवळ पुराव्यावरून सिद्ध झालेली व्यक्ति नसून त्यामध्यें कांहींतरी, किंबहुना, खूपसें अधिक असतें आणि हें जें ' अधिक ' तें कलावंताच्या नवनिर्मितिक्षम प्रतिभेवर अवलंबून असतें आणि म्हणूनच, चरित्रापेक्षां कादंबरीमधून व्यक्तीचें खरेंखुरें सर्वांगीण दर्शन घडण्याची शक्यताच अधिक असते.

## भावनोद्दीपन व संस्कारक्षमता

ललितवाङ्मयाच्या ठिकाणीं रसिकाच्या भावना जागृत करण्याची एक शक्ति असते. तसेंच त्याच्या परिशीलनानें रसिकाच्या मनावर, त्याच्या स्वभावावर आणि नीतीवर, अप्रत्यक्ष कां होईना पण एक सूक्ष्म परिणाम हा सतत होत असतो. त्या दृष्टीनें जर आपण कादंबरी आणि चरित्र या दोन वाङ्मयप्रकाराकडे पाहिलें तर आपल्याला दिसून येईल कीं भावनोत्कट-तेच्या संदर्भात कादंबरी श्रेष्ठ ठरते. कादंबरीप्रमाणें कल्पनाशक्तीच्या साहाय्यानें जीवनानुभवाचें व व्यक्तीचें चित्रण करण्याची मोकळीक चरित्रकाराला नसल्यामुळें, किंवा चरित्राच्या शास्त्रीय अंगामुळें त्याच्या कलात्मतेला पडणाऱ्या मर्यादांच्या कक्षेत राहूनच चरित्र रंगवावयाचें, कल्पनाशक्तीचा विलास साधावयाचा असल्यामुळें चरित्रामधील व्यक्तिचित्रणांत – जविन-दर्शनांत खूपवेळां तुटकपणा येतो. भावनोत्कर्षाच्या ठिकाणीं चरित्रकाराला आपल्या कल्पनाशक्तीला लगाम घालावा लागतो. त्यामुळें भावनाजागृतींत आणि रस-निर्मितींत पदोपदीं अडथळे येतात. परंतु त्याबरोबर हेंहि खरेंच कीं, रसिकाच्या मनावर संस्कार करण्याच्या बाबतींत मात्र चरित्र हें कादंबरीवर निश्चितपणें मात करितें. कादंबरीमधील व्यक्ति ही कल्पनेची निर्मिती आहे, तिचें जीवन हें संपूर्णपणें प्रत्यक्ष सृष्टी-मधील नसून एका नवनिर्मित वेगळ्या सृष्टींतील आहे; आणि त्याउलट, चरित्रामधील व्यक्ति ही आपल्याच विश्वांतील आहे, आपल्याप्रमाणेंच तिच्यावरहि बंधनें होतीं, तिलाहि तिच्या जीवनकार्यांत अडथळे होत होते, आणि तरीहि ती व्यक्ति जगण्याची, ह्या सर्व विरोधामधून तरून कांहींतरी करण्याची धडपड

करीत होती, हें रसिक कधींहि विसरत नसतो. आणि म्हणूनच भावनाजागृतीच्या बाबतींत चरित्र कमी पडलें तरी सर्वसामान्य समाजावर संस्कार करण्याच्या दृष्टीनें तेंच श्रेष्ठ ठरतें.

परंतु चरित्राचा हा गुण लक्षांत घेऊन जर कोणी त्याचा समाजाला शिकवणूक देण्याचें एक साधन म्हणून उपयोग करण्याचें ठरविलें तर मात्र कलात्मक अलिप्ततेच्या व प्रांजळपणाच्या अभावामुळें त्यांतील व्यक्तिचित्रणांत बाध येईल. अशानें तें कलागुणांना तर पारखें होईलच, पण ज्याची शिकवणूक द्यावयाची होती तेंहि तसेंच राहून जाईल आणि मग धड ना कलात्मक चरित्र धड ना बोधवादी कृति अशी त्या लेखनकृतीची अवस्था होईल.

## आत्मचरित्र, सामर्थ्य व मर्यादा

आतांपर्यंत आपण पाहिलें कीं व्यक्तिसंबंधींचा पुरावा हा संपूर्णपणें विश्वसनीय नसल्यामुळें चरित्र व्यक्तीसंबंधींचें संपूर्ण सत्य सांगूं शकत नाहीं. त्याचप्रमाणें, चरित्रकारावर पुराव्यानें सिद्ध होणाऱ्या व्यक्तित्वाचेंच केवळ दर्शन घडविण्याचें बंधन असल्यामुळें तो कादंबरीकाराप्रमाणें आपल्या कल्पनाशक्तीच्या साहाय्यानें व्यक्तिमनाचा संपूर्णपणें थांग लावून घटना व संवाद निर्माण करून त्यांच्या चित्रणाद्वारें व्यक्तीचें अंतर्बाह्य सर्वांगपरिपूर्ण दर्शन घडविण्यास असमर्थ ठरतो. त्यामुळें व्यक्तिदर्शन हेंच चरित्राचें खरें साध्य असलें तरी त्यामध्यें उणीव राहून जाते. त्यामुळें धड ना कादंबरी, धड ना इतिहास अशी या लेखनप्रकाराची स्थिति होते. परंतु आत्मचरित्र हा असा एक लेखनप्रकार आहे कीं ज्याच्या संदर्भांत ह्या दोनहि अडचणी दूर होतात, आणि चरित्र हें एकाचवेळीं सत्यदर्शनात्मक, खऱ्या अर्थानें व्यक्तिदर्शनात्मक आणि कलात्मक होण्याची शक्यता निर्माण होते. ज्या एका चाकोरींतून जाणाऱ्या व्यक्तीच्या त्या विशिष्ट व्यक्तित्वाचें आणि चाकोरींतील जीवनाचें एकाचवेळीं सत्यदर्शनात्मक व कलात्मक चित्रण करण्याचें बाबतींत त्रयस्थ चरित्रकार असमर्थ ठरला त्याच व्यक्तीचें श्रेष्ठ अशा स्वरूपांत जीवनदर्शन आत्मचरित्रामधून घडणें सहज शक्य होतें. कारण, त्या अव्यक्त व्यक्तिमनाचा थांग कसा लावायचा, कल्पनेनें अशी त्याच्या वृत्तीची संगति लाविलीच तर ती पुराव्यानें सिद्ध करायची कशी, जर तें मन शेवटपर्यंत अव्यक्तच राहिलें तर कल्पनेनें घटना उक्ति-कृति यांची निर्मिति न करितां त्यांचें चित्रण करायचें कसें इत्यादि जे नाना प्रश्न त्रयस्थ चरित्रकाराच्या संदर्भांत निर्माण होतात ते आत्मचरित्राच्या बाबतींत संभवत नाहींत. कारण ती व्यक्ति स्वतःचें, स्वतःच्या मनाचें चित्र स्वतःच काढणार असते, स्वतःचें जीवनदर्शन स्वतःच घडविणार असते आणि इतरांना जरी ती अव्यक्त, अगम्य असली तरी स्वतःला ती संपूर्णपणें ओळखूं शकते आणि म्हणूनच येथें कल्पनेनें संगति लावण्याचा, कल्पनेनें प्रसंग वा उक्तिकृति निर्माण करण्याचा प्रश्नच येत नाहीं. तेव्हां अशा व्यक्तीनें जरी लिहिलें तरी तें आत्मचरित्र, कलात्मकतेनें लिहिलें म्हणजे आपोआपच श्रेष्ठ चरित्र होईल.

परंतु ह्या आत्मचरित्रलेखनांतहि अनेकवेळां दोष निर्माण होतात. कित्येकदां प्रांजळपणाच्या, स्व-भावविस्मृतीच्या व कलात्मक अलिप्ततेच्या अभावीं आत्मचरित्र हें आत्मदर्शनात्मक होण्याऐवजीं आत्मसमर्थनात्मक, आत्मप्रदर्शनात्मक, प्रतिपादनात्मक बनतें. तर कित्येकदां आत्मदर्शनाचा हेतु असूनहि अनेक अडचणीमुळें त्यामध्यें चरित्रम्हणून उणीवा राहून जातात.

आपल्या जीवनांतील कित्येक गोष्टींचें आपल्याला विस्मरण पडलेलें असतें. बालपणाच्या संदर्भांत तर ही गोष्ट आपल्याला विशेषेंकरून जाणवते. आपलें बाळपण हें जर अत्यंत चित्र-विचित्र घडामोडींनीं नटलेलें असलें तरच तत्संबंधीं कांहीं विशेष लक्षांत राहाणें शक्य आहे. परंतु, बहुधा बाळपण हें धुक्याचा झिरझिरीत पडद्याआड नाहींसें झालेलें असतें, आणि म्हणूनच एखादा तपशील आठविण्यापलीकडे तत्संबंधी मनांत बराचसा गोंधळच असतो. ह्या अस्फुट आठवणींना कांहींवेळां वडिलमंडळींमुळें उजाळा मिळतो. परंतु तरीहि एकंदरींत ह्या काळामधील आपल्या जीवनाचें सर्वसाधारणपणें एक स्थूल रूपच आत्मचरित्रकाराच्या डोळ्यापुढें असतें. कित्येकदां, कांहींच आठवलें नाहीं म्हणजे हा आत्मचरित्रकार कल्पनेनें बाळपण निर्माण करून त्याचें चित्रण करायलाहि तयार असतो. आणि म्हणूनच जवळ जवळ सर्वच आत्मचरित्रामधून ह्या बाळपणाचें एक स्थूल, सर्वसाधारण








असें स्वरूपच चित्रित होत असतें. असें दिसतें. त्यामध्यें कोणतेंहि वेगळेंपण हें सहसा येत नाहीं.

कित्येकदां असेंहि घडतें. कांहीं प्रसंग घडल्यावर कालांतरानें तत्संबधीं विचार करीत असतांना आपल्या मनांत अशा अनेक कल्पना–विचार येतात कीं ज्यांचा त्या प्रसंगांशीं अत्यंत निकटचा असा संबंध असावा असें नंतर जाणवतें. आणि अशावेळीं, व्यक्ति जेव्हां आत्मचरित्रांत त्या नव्या दृष्टिकोणामधून त्या प्रसंगांचें चित्रण करूं लागते, तेव्हां आपोआपच त्याच्या प्रत्यक्ष गतजीवनांत आणि त्याच्या चित्रणांत अनंत अंतर पडतें.

कित्येकदां, व्यक्तीच्या जीवनांत असे कांहीं प्रसंग घडलेले असतात कीं, त्यांची उघड वाच्यता करण्याचा तिला संकोच वाटतो. तर कित्येकदां, तिला आपल्या जीवनाचें प्रांजळपणें चित्रण करावयाचें असलें तरी, कांहीं वेळां कांहीं प्रसंगांचें चित्रण हें तत्संबंधित अशा कांहीं व्यक्तींच्या उल्लेखाशिवाय करणें जवळजवळ अशक्यप्रायच असतें; आणि त्याबरोबरच त्या व्यक्तींना समोर ओढणें इष्ट नसतें. अशावेळीं त्यांना वगळून त्या तुटलेल्या प्रसंगाचें जोडलेलें स्वरूप आपल्या-पुढें ठेविलें जातें, किंवा, तो प्रसंग महत्त्वाचा असूनहि संपूर्णपणें गाळला जातो. आणि त्यामुळें परिणामीं त्या आत्मदर्शनामध्यें उणीव राहून जाते. तर, कित्येकदां, आत्मचरित्रकार हा आपलें जीवनदर्शन आहे त्याहून हृद्य, रम्य, खेळकर व जिवंत (?) करण्याच्या कल्पने-च्या आहारीं जातो. आणि असें झालें कीं मग त्या आत्मचरित्रामध्यें कल्पनाशक्तीच्या विलासालाच अधिक महत्त्व येऊं लागतें, आणि त्या लेखनकृतीमधून संपूर्ण सत्यदर्शन घडण्याची शक्यता कमी होत जाते.

अशा अनेक गोष्टींमुळें आत्मचरित्रामधूनहि प्रांजळ आविष्कार क्वचितच दृष्टीस पडतो. अशी एखादीच लक्ष्मीबाई टिळक येते, आणि अलंकारिकतेचा, परिणाम साधण्याचा हव्यास न धरितां प्रांजळपणें स्वतःच्या गुण-दोषांसहित आपल्या जीवनाचें चित्रण करीत आपल्या संपूर्ण व्यक्तिमत्त्वाचें सत्यदर्शनात्मक आणि कलात्मक दर्शन घडवून जाते.

एकंदरींत पाहतां, चरित्रलेखन ही एक तारेवरची कसरतच आहे. चरित्रवाङ्मयाकडून आपण एकाच-वेळीं शास्त्रीय सत्य–पुराव्यानें सिद्ध झालेलें सत्य आणि कलात्मकता अशा परस्परांशीं खूपशा विसंगत अशा गुणांची अपेक्षा करीत असतों आणि म्हणूनच " A well written biography is rarer than a well spent one " असें म्हटलें जातें. परंतु एक गोष्ट मात्र खरी कीं चरित्रवाङ्मयाच्या परिशीलनानें कांहींतरी अगम्य, गूढ, अद्‌भुत पाहिल्याची जाणीव न होतां, उलट, आपल्यासारखीच एक व्यक्ति ह्याच जगांत, अनेक अडचणींशी झुंजत, पडत आणि पुन्हां उठत, आपलें ध्येय गाठण्याची धडपड करीत आहे हें पाहून ' आपणहि असें कां करूं शकणार नाहीं ' अशा प्रकारचा आत्मविश्वास वाचकाच्या मनांत निर्माण होतो. आणि म्हणूनच, चरित्र हा जितका कठीण तितकाच प्रत्ययकारी, परिणामकारक असा एक वाङ्मय-प्रकार आहे.

प्रा. मधुसूदन फडके

# जगद्गुरु कृष्णमूर्ति व त्यांची विचारसरणी

जगद्गुरु कृष्णमूर्तींचा जन्म जिद्दू आडनांवाच्या तेलुगु ब्राह्मण कुटुंबांत १२ मे १८९५ रोजीं दक्षिणेंत मदनपल्ली येथें झाला. त्यांचे वडील नारायणय्या हे तेथें तहशीलदार असत. श्रीकृष्णाप्रमाणें कृष्णमूर्ति हें देखील त्यांचें आठवें अपत्य ! दहा वर्षांचे असतांनाच आईचा वियोग झाला. कृष्णमूर्तींची मुद्रा मंद व मूर्ति कृश दिसली तरी बुद्धि तल्लख व वृत्ति स्वप्नाळू असे. अडयार नदीच्या कांठीं आपल्याच नादांत भ्रमन्ती करण्याची त्यांना लहानपणी हौस वाटे. आई वारल्यानंतर दहाच दिवसांत तिचें याना पुनर्दर्शन झालें. लहानपणी प्रगट झालेली ही अलौकिक सूक्ष्मदृष्टि पुढेंहि बरीच वर्षे टिकून होती. महादीक्षा घेतल्यानंतर बुद्धगया येथें त्यांना गौतमबुद्धाचा साक्षात्कार झाला अशीहि माहिती उपलब्ध आहे.

## पूर्वतारक

स्वतः नारायणय्या थिऑसॉफिकल सोसायटीचे निष्ठावन्त सभासद होते. १९०७ सालीं ते सेवानिवृत्त झाले. त्यापुढील काळ अडयार येथे घालविण्याचा आपला मनोदय सोसायटीच्या प्रमुख डॉ. ॲनी बेझंट यांच्याजवळ त्यांनीं प्रगट केला. होय नाही म्हणता कांहीं कालावधीनंतर त्याना परवानगी मिळाली. व १९०९ मध्यें आपल्या मुलांसह ते अडयार येथे राहावयास आलें. त्यावेळीं प्रख्यात थिऑसॉफिकल ग्रंथकार व गूढशास्त्रज्ञ लेडबीटर हेदेखील युरोपांतून तेथेच येऊन राहिले होते. जगद्गुरुंच्या आगमनाची जाहीर घोषणा जगभर करावी अशी त्यांना व बेझंटबाईना त्यांच्या गुरुदेवाकडून आज्ञा झाली होती. त्यासाठीं व्याख्यानें देत बाई जगाच्या दौऱ्यावर फिरूं लागल्या. इकडे कृष्णमूर्तींना पाहतांच हे आपले प्राचीन जिवलग मित्र आहेत अशी लेडबीटरना ओळख पटली. त्यांनीं सोसायटीच्या अनेक सभासदांचे पूर्वजन्म संशोधिले होते. त्याप्रमाणें संशोधनकरितां कृष्णमूर्तींच्या पूर्वजन्मांतहि ते निःस्वार्थी व दयाळू असल्याचें गौतमबुद्धासारख्या महापुरुषाच्या सान्निध्यांत राहून त्यांनीं लोकसेवेचा मार्ग अनुसरल्याचें त्यांना आढळून आलें. इतकेंच नव्हे तर ज्याच्या आगमनाची वार्ता सांगावयाची त्या जगद्गुरूंचा अवतार याच बालमूर्तींत व्हावयाचा आहे असाहि त्यांना साक्षात्कार झाला. व्याख्यानाचा दौरा संपवून बेझंटबाई वर्षभरानें परत आल्या तेव्हां पूर्वीचा ख्रिस्त व पुढे यावयाचा मैत्रेय याचाच हा अवतार आहे ही कल्पना त्यानाहि मान्य झाली. त्यावेळीं कृष्णमूर्ति व त्यांचे धाकटे बंधु नित्यानंद मद्रासमध्यें मैलापूरच्या शाळेंत जात. त्या दोघांच्याहि शिक्षणाची जबाबदारी बाईनीं आपल्याकडे घेतली. नारायणय्यांनीं मुलाचें रीतसर पालकपत्रहि बाईना दिलें. तेव्हांपासून हीं मुलें त्यांच्याजवळच राहूं जेवूं लागलीं.

११ जानेवारी १९११ रोजीं अडयार येथील पीठांत कृष्णमूर्तींना पहिली महादीक्षा देण्यांत आली. ती साक्षात् मैत्रेयांनीं दिली असें म्हणतात. पुढल्या वर्षीं याच तारखेस कृष्णमूर्तींच्या कार्यासाठीं "पूर्वतारकसंघ" ( Order of the star in the East ) ही संस्था बेझंटबाईनी उभी केली. कृष्णमूर्ति हे तिचे प्रमुख व स्वतः बेझंटबाई व बिशप लेडबीटर हे संरक्षक म्हणून नियुक्त झाले. (१) जगद्गुरुंच्या आगमनाची वार्ता प्रसृत करणें, (२) त्यांचें स्वागत



अनुक्रमणिका






व सेवा करण्यास तयार असलेल्यांची संघटना करणें व, (३) त्यांच्या निर्याणानंतर त्यांचें कार्य चालू ठेवणें हें संस्थेचें उद्दिष्ट ठरविण्यांत आलें. ' तारकदूत ' म्हणून संस्थेचें मासिक मुखपत्रहि सुरू करण्यांत आलें.

इकडे हा सर्व प्रकार अंधश्रद्धेचा, भ्रष्टाकाराचा व मुलांच्या अहिताचा आहे असें नारायणय्या यांच्या मनांत जुन्या मताच्या नातलगांनीं व स्नेह्यांनीं भरवून दिलें. त्यामुळें नारायणय्यांनीं मुलें आपल्या ताब्यांत परत मिळविण्याबद्दल बेझंट बाईवर फिर्याद लावली. तें काम प्रिव्ही कौन्सिलपर्यंत चाललें. अखेरचा निर्णय मात्र बाईंच्या बाजूनें झाला. दरम्यान बाईंनीं मुलांना विलायतेस पाठविलें व तेथे प्रो. वुडहाउस व जिनराजदास प्रभृति मंडळींच्या मार्गदर्शनाखालीं त्यांच्या पुढील शिक्षणाची व्यवस्था लावली. त्या योजनेप्रमाणें नित्यानंद ऑक्सफर्डचे बी. ए. झाले. मात्र कालांतरानें क्षयाचा विकार जडून १९२५ मध्यें अल्पवयांतच कॅलिफोर्नियांत मरण पावले.

ठराविक चाकोरींतून जाणाऱ्या शिक्षणक्रमाबद्दल स्वतः कृष्णमूर्ति मात्र फारसे उत्सुक नव्हते. तथापि त्यांचें स्वतंत्र वाचन जबर होतें आणि योगाभ्यासहि चालू होता. १९२१ पासून ते आपले विचार लेखनांतून प्रगट करूं लागले व व्याख्यानें देत देशोदेशीं दौऱ्यावर जाऊं लागले. त्यांच्या कार्याकरितां हॉलंडमधील एरडे या गांवचा आपल्या मालकीचा किल्ला व भोवतालची पांच हजार एकर जमीन बॅरन पॅलँड नांवाच्या एका श्रीमंत गृहस्थानें त्यांना बक्षीस दिली. बेझंटबाईंनी अमेरिकेंत कॅलिफोर्नियामध्यें ' आर्यविहार' नांवाची एक इमारत त्यांना राहण्यासाठीं विकत घेऊन दिली. कृष्णमूर्तींच्या ४८ पूर्वजन्मांची माहितीहि बाईंनीं छापून प्रसिद्ध केली. त्यांच्या ठिकाणीं जगद्गुरुत्वाचा साक्षात्कार अनेकांना अनेक प्रसंगीं होऊं लागला.

## स्वतंत्र साधना

स्वतः कृष्णमूर्तींना मात्र जगद्गुरुत्वाची ही कल्पना रुचत नव्हती. आपल्या ठायीं जगद्गुरुत्वाचा अवतार व्हावयाचा आहे या सतत ऐकूं येणाऱ्या भविष्यवाणीचा त्यांना कंटाळा वाटत असे. प्राप्त परिस्थितीमुळें त्यांना इतरांच्या कह्यांत राहावें लागलें. पण केवळ दुसऱ्याच्या सांगण्यावर विश्वास ठेवून वागावें इतकी कांहीं त्यांची बुद्धि पांगळी नव्हती. सर्वांपासून शिकावें पण सर्व कांहीं स्वतः पारखून घ्यावें अशी त्यांची वृत्ति असे. सर्व गोष्टींचा स्वतः निर्णय केला पाहिजे ही स्वतंत्र बुद्धि जागृत असल्यामुळें १९१८ मध्यें फ्रान्सांत असतां सर्वांची नजर चुकवून दूर निघून जाण्याचाहि त्यांनीं एकदां प्रयत्न केला होता. जगद्गुरु म्हणजे काय व त्याचें आपण वाहन व्हावयाचें म्हणजे काय याचा त्यांनीं स्वतंत्रपणें विचार चालू केला. तसा आपला अधिकार पोचेल तर श्रीकृष्ण, खिस्त व मैत्रेय या सर्वांशी आपण एकरूप होऊं अशी आस्था त्यांनीं मनाशी धारण केली व इतरांनीं मनावर बिंबविलेल्या कल्पना झटकून देऊन आयासपूर्वक स्वतंत्र साधनेस सुरुवात केली. त्यांचे बंधु नित्यानंद वारले तेव्हां ते विशेष प्रकारच्या मनस्तापांतून होरपळून निघाले. हळुहळुं त्यांचे अंगी पूर्ण वैराग्य बाणून गेलें. १९२६ च्या सुमारास त्यांचा योगाभ्यास पूर्ण झाला व त्याच सालीं त्यांनीं संपूर्ण आत्मज्ञान संपादन केलें. तेव्हांपासून गुरु व संप्रदाय या सत्यशोधनाच्या मार्गांतील अडचणी आहेत असें क्रान्तिकारक प्रतिपादन ते करूं लागले. १९२९ मध्यें ' पूर्वतारकसंघाचे ' निरनिराळ्या देशांत सुमारें नव्वद हजार सभासद होते. ती समग्र संघटनाच त्यांनीं रद्द केली. एरडे येथील किल्ला व जमीन त्यांनीं ज्यांची त्यास परत केली. आर्यविहाराचाहि त्याग केला व जगांत ते संपूर्ण संन्यस्त वृत्तीनें राहूं लागले. तेव्हांपासून आजवर अनेक देशांत संचार








करून ते आपला प्रभावी संदेश देत आहेत. आज त्रिखंड कीर्तीच्या भारतीय महापुरुषांत त्यांची गणना होते. मित्रांच्या सूचनेवरून व त्यांच्याच योजने-प्रमाणें ते जगभर प्रवचनें देत हिंडतात. पूर्वीच्या सेंट्रल हिंदु कॉलेजमधून 'नव शिक्षणसंस्था' (Foundation for New Education) म्हणून एक विश्वस्त संस्था तयार झाली. राजघाट व आंध्रांत मदनपल्लीजवळ ऋषि व्हॅली येथें तिच्या मार्फत शिक्षणकार्य चालू असतें. वर्षांतून कांहीं दिवस कृष्णमूर्ति त्या ठिकाणीं येत असतात. संस्थेशी त्यांचा कोणताहि कायदेशीर संबंध नसला तरी त्यांचें आगमन तेथील लोकांना नेहमींच आनंददायक वाटतें. जगद्‌गुरुत्वाचा आव घालून ते कांहींहि बोलत नाहींत. त्यांची मुद्रा निर्व्याज व सुप्रसन्न, वृत्ति टाकोटाक अहंकाररहित व भाषा सोपी, सरळ, नेमकी व मोजकी असते.

ते सांगतात –

सत्याचें ज्ञान झाल्याशिवाय दुःखाचा निरास होणार नाहीं. सत्यजिज्ञासेच्या तळमळींतच दुःख-निवारणाचें बीज आहे.

सत्यज्ञान आपलें आपणच मिळवावयाचें आहे. त्याकामीं देव अथवा त्याचे दूत, साधु, संत, धर्म, पंथ, गुरु, ग्रंथ, नेता, एखादा विशिष्ट योग, तंत्र, सिद्धान्त अथवा नवमूल्यांचें साचेबंद तत्त्वज्ञान यापैकीं कशाचाहि उपयोग होणार नाही. नामें, संज्ञा, सूक्तें आणि अवतरणें यांना येथें मुळींच महत्त्व नाहीं. उसनीं मतें, श्रद्धा नि विचारसरणी यांच्या योगें येथें निभण्यासारखें नाही. परप्रत्ययावर भिस्त ठेवल्यानें तुमचें मन भित्रें, अस्थिर, प्रवाहपतित, परावलंबी व साशंक राहतें. परिस्थितीच्या व मता-मताच्या प्रत्येक झोताबरोबर तें डळमळूं लागतें. यास्तव ज्यांना सत्यज्ञान हवें असेल त्यांनीं पूर्वसूरींचा अधिकार, परंपरा, श्रद्धा, रूढी, ध्येयें, पूर्वग्रह, किंबहुना कोणत्याहि प्रस्थापित अथवा पूर्वनियुक्त कल्पनेचा आश्रय घेण्याची सवय सोडून दिली पाहिजे. कोणत्याहि ठसेदार शब्दांत अथवा कल्पनेंत सत्य सांपडूं शकत नाहीं. इतकें तें अनन्यरूप व एकमेवाद्वितीय आहे. त्याचा प्रत्यय ज्याचा त्याला जेथल्या तेथेंच घेतां येईल.

रूढ कल्पनांचें रान तोडल्याशिवाय सत्याचें दर्शन होणार नाहीं. सोपाधिक सृष्टीसंबंधीं नित्याच्या सवयीप्रमाणें स्वीकारलेल्या, वाचलेल्या, ऐकलेल्या व स्मृतीनें सांठविलेल्या कल्पनांमध्यें सत्य प्रगटूं शकत नाहीं. आपण स्वतःचा व सृष्टीचा जो सामान्य अनुभव घेत असतो त्यांतून सत्यप्रतीति होत नाहीं तसा स्मृतीचा आश्रयदेखील सत्यज्ञानास उपयोगी पडत नाहीं. गतकालाच्या आश्रयानें वर्तमानकाळ समजणार नाहीं. स्मृतिनिविष्ट कल्पना म्हणजे भितऱ्या माणसानें स्वतःस लपण्यासाठीं रचलेल्या आडोशाच्या जागा होत. असल्या कल्पना जिवंत, गतिमान् किंवा क्रियावान् नसतात. असल्या बैठ्या व जडमूढ कल्पनांच्या आधाराने सत्य अमूकच आहे म्हणून सांगणें हट्टीपणाचें आहे. असल्या ठरीव ठोकळेबाज कल्पनांचा आश्रय करून मला नक्की माहीत आहे असें जो म्हणतो त्याला नक्की माहीत नसतें असें समजावें!

आत्मज्ञान हेंच सत्यज्ञान

कालगतीची वाट ही उत्कंठेची, धडपडीची, यशापयशाची व अज्ञानाची वाट होय. या वाटेला सत्य कधींहि गवसावयाचें नाहीं. कारण सत्य हें कांहीं एकाद्या प्रयत्नाला येणारें फळ अथवा करा-मतीला मिळणारें पारितोषिक नव्हे. सत्य ही खटा-टोपानें बनवावयाची वस्तू नव्हे कीं पराक्रमानें गांठावयाचें ध्येयहि नव्हे. सत्यभूमींत 'मार्ग' नाहींत. कालगतीच्या वाटेनें धावाधाव करून सत्य हातीं लागा-वयाचें नाहीं. त्यासाठीं आधीं धावावयाचें थांबलें पाहिजे. इतस्ततः धावत असणारी विचारभावनात्मक मनःप्रक्रिया (Thought feeling) तृष्णातृप्तीचा



अनुक्रमणिका






'धावा' थांबवील तर सत्य जेथल्या तेथेंच सांपडणार आहे. सत्य कालांत नाहीं, कालातीत आहे. तें जाणतां येत नाहीं. अनुभवतां येतें. तें जेथल्या तेथें स्फुरणारें, जेथल्या तेथें वसलेलेंच आहे. तें कोठें तरी जाऊन हस्तगत करावयाचें नसून आपल्या ठिकाणींच अनुभवावयाचें आहे. आपल्या शुद्ध आत्मस्वरूपाचें ज्ञान हेंच सत्यज्ञान होय. तेंच आपल्या विकासाचें उद्दिष्ट व तेंच जगताचेंहि परमज्ञान होय.

आत्मज्ञानांतच अनन्ताचेंहि ज्ञान आहे. आदि, मध्य, अन्त सारें कांहीं आपल्यांतच आहे. जसें आपण आहों तसेंच जग आहे. तुटक अलग असें कांहींच नाहीं. जें जें आहे तें एकच एक अविभक्त आहे. अखिल, अखंड, सर्वरूप असें जें जीवचैतन्य तेंच सर्व वस्तूंचें बीज आहे. अस्तित्व ही एकाच शक्तीची प्रक्रिया. तीच मर्यादा घालते व घालूनहि नेते. तींमधून व्यक्तित्व, त्याची जाणीव आणि जाणिवेंतील ज्ञान, संवेदन, निश्चयादि अवस्था उत्पन्न होतात. मात्र व्यक्तित्व एकाच मूलशक्तीच्या प्रक्रियेंतून उद्भवत असलें तरीहि तें ज्याचें त्याचें निराळें व अद्वितीय असतें.

## सम्यक्‌चिंतन

आत्मज्ञानाचा लाभ हें आत्मनिरीक्षणाचें, निदिध्यासाचें व मेहनतीचें काम आहे. त्यासाठीं वृत्तीमध्यें परिपूर्ण ऋजुता, नम्रता व सचोटी असली पाहिजे. सूक्ष्म विचारशक्ति, चिकाटी व निरासक्ति यांचीहि जोड मिळाली पाहिजे. पूर्ण वस्तुलक्षी दृष्टीनें आपल्या साऱ्या विचारांचें व भावनांचें निरीक्षण करावयाचें. तें करितांना मन शांत, मुक्त, निःसंकल्प पण सावध राखावयाचें. कोणताहि विकार आणि विचार मुद्दाम उत्तेजित करावयाचा नाहीं कीं दाबूनहि टाकायचा नाहीं. त्याचा बरेवाईटपणा ठरविण्याचा बळें यत्न करावयाचा नाहीं. कारण आत्मनियमन हाहि बंधच आहे. असें केलें असतां आपल्या भावना-कल्पनांचीं पाळेंमुळें स्वच्छ दिसूं लागतील. तींहि जाणून भावून टाका. ही चिंतनशील जाणीव सतत जागती ठेवा. अशा सतत आत्मावधानामुळें मन प्रसन्न होईल, अहंकार गळून जाईल, आपण कोण हें समजून येईल, जगताचेंहि सत्य स्वरूप कळून चुकेल आणि आपले विचार, भावना व कृती यांच्या पद्धतींत क्रांतिकारक बदल होईल.

सम्यक्‌चिंतन ही एक प्रक्रिया, एक यत्नप्रकार, आचरणाची एक पद्धत आहे. विवेक आणि भावना या दोहोंचाहि उन्मेष त्यांत आहे. त्यांमध्यें वस्तूपेक्षां रीतीला महत्त्व आहे. 'चिंतन कशाचें ?' हा प्रश्न गौण असून 'चिंतन कशा तऱ्हेचें ?' हा प्रश्न प्रधान आहे. सम्यकचिंतनाचेंहि विशिष्ट तंत्र आहे असें मानण्याचें कारण नाहीं. येथेंहि गुरु, ग्रंथ किंवा तंत्र यांचा उपयोग नाहीं. सम्यक्‌चिंतनाची सिद्धीसुद्धां आपली आपणच संपादन करावयाची आहे. आदर्शीचें अनुकरण करून 'प्रशस्त कल्पनांचा' लाभ आपणास होईल. पण प्रशस्त कल्पना मनांत बाळगणें म्हणजे सम्यक्‌चिंतन नव्हे. सम्यक्‌चिंतनाची किमया व्याख्यान-प्रवचनांतून मिळावयाची नाहीं. सम्यक्‌चिंतनाविषयींचे दुसऱ्याचे विचार ऐकून त्याची जोड आपण करूं शकत नाहीं.

आत्मज्ञान मिळविण्यासाठीं मनोवृत्ति अंतर्मुख होते याचा अर्थ आत्मज्ञान म्हणजे स्वयंकेंद्रितपणा असा नव्हे. विचारांच्या निरोधानें अथवा केवळ संकोचानें, असमावेशानें आणि अव्हेरानें प्राप्त होणारी स्मशानशांततेची अवस्था म्हणजे आत्मज्ञान नव्हे. आत्मज्ञानासाठीं 'नेति नेति' म्हणत मागे फिरणारी ही विचारसरणी वरपांगी अकरणरूप व निराशय दिसते हें खरें, पण तीच केवळ सुसंगत असल्यानें सर्वांत श्रेष्ठ प्रतीची, प्रभावी व समर्थ विचारसरणी होय.

आत्मज्ञान मिळवण्यासाठीं जीवनांतून उठून जाण्याचें कारण नाहीं. संसार सोडण्याची कल्पना वस्तुस्थितीला सोडून आहे. असणें याचा अर्थच



अनुक्रमणिका







गुळलेलें, जडलेलें, निरनिराळया नात्यानी बांधलेलें असणें. तुटून फटकून राहण्यास त्यांत वाव नाहीं. जगांतले व जीवनांतले अनुभव घेतां घेतां आत्मज्ञान जेथल्या तेथेंच होऊं शकेल.

## दु:खनिवारण

जगांत दु:ख आणि वैषम्य आहे. आपणच तें उत्पन्न केलें, आपणच तें दूर केलें पाहिजे. आत्मज्ञानानेंच तें दूर होईल.

आज जगतामध्यें नाना राष्ट्रें, वंश, वर्ग आणि वैचारिक यांचे तंटे पडले आहेत. आपलें एकमेकाशी व आपलें आपल्याशींहि पटत नाहीं. जनांत भांडणें, मनांतहि भांडणें लागलीं आहेत. जिकडे तिकडे भेदाचें व झगडयाचें वातावरण पसरलें आहे. फसवाफसवी, हटातटी, स्पर्धा, आडवा आडवी, विरोध, जबरदस्ती, नेतेगिरी व सांप्रदायिक अभिनिवेश यांचा मामला जोरांत चालू आहे.

आपल्यापुढें अनेक प्रश्न उभे आहेत. पण त्या एकेकाचा स्वतंत्र विचार करून चालणार नाहीं. निरनिराळे तुकडे एकत्र करून सत्य संपादन करितां येत नाहीं. सत्याला पैलू नाहींत. तें येथून तेथून एकरूप, एकसंध आहे.

आपलें दु:ख जाणवल्याबरोबर आपण सामाजिक किंवा राजकीय उद्योगांत मन घालतो, पण हा कांहीं दु:खावरील खरा तोडगा नव्हे. प्रस्थापित आर्थिक व सामाजिक परिस्थितीच्या चौकटींत स्फुरलेल्या कल्पना आणि तिनें मनावर केलेले संस्कार यांच्याहि मदतीनें आपले प्रश्न सुटणार नाहींत. इन्द्रियांच्या तात्कालिक व तांतडीच्या स्फुरणानुसार आपण वागत जातो, तात्पुरत्या परिस्थितीकडे पाहून सामाजिक व आर्थिक योजना आखतो व आपल्या समस्या सोडविण्याचा यत्न करितो. तथापि यामुळें जगांत सामरस्य व एकतानता उत्पन्न होण्याऐवजीं भांडणें वाढतात व अधिकच गोंधळ पैदा होतो. ठरीव कल्पना, तयार योजना आणि कर्मठ श्रद्धा यांचा आश्रय करून आपले प्रश्न सुटणार नाहींत. सांप्रदायिक धर्माला शरण जाऊनहि काम भागणार नाहीं. कारण जितके धर्म, तितके तट, तितका दुजाभाव, तितके संग्राम ! सांप्रदायिक धर्माच्या योगें जगाचें भलें होण्याऐवजीं विरोध आणि जुलूम यांत भरच पडली आहे. किंबहुना जें जें सान्त व सोपाधिक तें तें बंधनकारक असल्यामुळें त्याच्या चिंतनांतून तृष्णा, अज्ञान व झगडे यांचाच जन्म होतो. भव्य राजकीय कार्यक्रमांच्या भावी उद्दिष्टांतून सुख उत्पन्न होणार नाहीं, सुखाचा उगम भवितव्यांत नव्हे, वर्तमानांत आहे.

दुसऱ्याला मदत करूनहि जगांतील दु:ख दूर होणार नाहीं. मदत करण्याची वृत्ति अहंकारजन्य आहे. दुसऱ्याला मदत करण्याच्या भावनेंत दर्प आहे, गर्व आहे. आपण सारे सारखेच आहोंत तर मग दुसऱ्याला मदत करणारे तुम्ही निराळे कोण ? तुम्ही स्वत:च जर असहाय आहां तर तुम्ही जगाला साहाय्य तें काय करणार ? आधी स्वत:ला साहाय्य करा म्हणजेच जगाला मदत होईल !

## आत्मज्ञान हाच उपाय

जगांत दुहि माजली आहे. आपल्या सामाजिक संबंधांत उदारता राहिलेली नाहीं. याचें कारण आपल्या स्वत:च्या प्रेरणांतच मुळीं विसंगति आहे. जगांतील विसंवाद हें आपल्या आत्मिक विसंगतीचेंच प्रतिबिंब आहे. जो जो आपल्या अंतर्यामीं पाहावें तो तो आपल्या वर्तनाच्या मुळाशी विच्छेदक प्रेरणा दिसूं लागतात. म्हणूनच समाजाचें शतशः विच्छेदन झालें आहे.

दु:खाचें मूळ आपल्या वर्तनांत आपल्या इच्छा –आकांक्षांत आहे. जसें वर्तन तसे परिणाम. जसें साधन तसें फळ. साधनें वाईट असतील तर फळेंहि वाईटच निपजणार. शांतपणानें वागलें नाहीं तर शांति मिळणार नाहीं. ठोशास ठोसा देणें हें नैतिक







नैतिक म्हणून कितीहि आवर्जून सांगितलें तरी तें अनैतिकच होय.

समाज तरी तुमच्याहून निराळा कुठें आहे ? जें तुम्ही नैतिक मानतां तेंच समाजांत मानलें जातें. तुमच्या गुणाकारांतूनच समाज बनला आहे. तुम्ही बदलला तर समाज बदलेल. तुम्ही चांगले व्हाल तर जग चांगलें होईल. आपल्याला हवी आहे ती क्रांति अन्य कोणीहि घडवून आणूं शकत नाहीं. आपण स्वतःच ती घडवून आणली पाहिजे.

वरवरच्या मलमपट्ट्यानी दुखणें बरें होणार नाहीं. त्यासाठीं प्रसंगविशेषीं स्फुरलेल्या तात्कालिक मूल्यकल्पना टाकून मूलभूत मूल्यांची चिकित्सा केली पाहिजे. आपल्या साऱ्या प्रश्नाचें मूलस्वरूप नि आदिकारण काय हें समजून घेतलें पाहिजे. अटीतटी व आग्रह सोडून अत्यंत प्रामाणिकपणानें व निर्भयतेनें आत्मपरीक्षण केलें पाहिजे. आपल्या वर्तनामागचे हेतू शोधून तपासून घेतले पाहिजेत. आपल्याला जें आवडत नाहीं त्याला हिरीरीनें विरोध करण्याची किंवा एकाद्या मताचा वा कल्पनेचा आश्रय करून मूळ मुद्दा चुकविण्याची आपल्याला खोड लागली आहे. ज्याला सत्य समजून घ्यायचें आहे त्यानें कर्मठ श्रद्धा नि हट्ट तसा निव्वळ शंकेखोरपणाहि सोडला पाहिजे.

आपण सारे जगत्प्रक्रियेचेच अंश आहोंत तर मग स्वतःला जाणल्या वाचून जगताला कसें जाणतां येईल ? आपल्या इच्छा, आकांक्षा व हेतू माहीत नसतील तर दुसऱ्याचा व आपला विरोध कोठें आहे, हें आपल्याला कसें जाणतां येईल ? जसे आपण आहो तसें जग आहे. जगाचे प्रश्न हे खरोखर आपलेच प्रश्न आहेत. जगांतलें दुःख दूर करावयाच असेल तर प्रथमतः आपण स्वतःची पाहणी केली पाहिजे. समाजाच्या संसारांत शिस्त व शांतता उत्पन्न करावयाची तर आपणांस स्वतःपासून सुरुवात केली पाहिजे. आत्मज्ञानावाचून बाळगलेल्या श्रद्धा, रचिलेलीं ध्येयें व संकल्पिलेल्या योजना व्यर्थ होत.

### तृष्णा व अहंकार

आपल्या अंतर्यामाचा अत्यंत प्रांजलपणानें ठाव घेतल्यास असें दिसतें कीं, आपली सारी जाणीव तृष्णेनें ग्रस्त झाली आहे. तृष्णाच आपल्या साऱ्या चित्तवृत्तींना आकार देत आहे. आपल्या प्रेरणांची, भावनांची आणि वर्तनाची दिशा आणि आपल्या ज्ञानाचें, स्मृतीचें, संकल्पांचें व परस्पर संबंधांचें स्वरूप तृष्णाच ठरवीत आहे. तृष्णेमागें अहंकार आहे. त्यांतूनच अज्ञान आणि दुःख उत्पन्न झालें आहे. आपल्या डोळ्यावर अहंकाराचें झापड आहे. त्यामुळें सृष्टीचें व संसाराचें सत्य स्वरूप आपणास दिसेनासें झालें आहे. वस्तू सत्य आहेत पण आपला अहंकारी दृष्टिकोन मिथ्या आहे. त्यामुळें त्यांचें सत्य स्वरूप समजेनासें होऊन वस्तुजाताशी व व्यक्तिमात्राशीं आपलें ठायीं ठायीं भांडण जुंपलें आहे.

आपण एकेकटे सुरक्षित कसे राहूं या इर्षेनें जो तो पछाडला आहे, आणि स्वार्थसंपादनाच्या उद्योगांत गढून गेला आहे. लोभांतून भय, मत्सर व आक्रमकवृत्तीचा जन्म होणें अपरिहार्य आहे. या प्रवृत्तींतूनच झगडे उद्भवले आहेत आणि मनुष्यामनुष्यांतील खरें नातें आपणास दिसेनासें झालें आहे.

दुःखावर सुख हा उपाय नव्हे. सुखाच्या लोभांतून दुःखच उत्पन्न होतें, सुखलाभ होत नाहीं. सुख हा जीविताचा प्रधान उद्देश होऊंच शकत नाहीं. सुखदेखील सत्याच्या अनुषंगानेंच उत्पन्न होतें. आत्मप्रत्यय येईल व आपल्या प्रामाणिक प्रेरणा प्रगट होतील तरच दुःख नाहींसें होईल.

आपलीं सर्व दुःखें आपल्या तृष्णेतून उत्पन्न झालीं आहेत. दुःखमुक्त व्हावयाचें असेल तर








तृष्णामुक्त झालें पाहिजे; लोभ संपला नाहीं, भय संपलें नाहीं तोवर दु:खहि संपणार नाहीं.

तृष्णामुक्त होणें याचा अर्थ कामना किंवा गरजा मारून टाकणें असा नव्हे. गरजा मारणें म्हणजे साक्षात् मरून जाणेंच होय. भयावर धैर्य हा उपाय नव्हे. लोभावर संन्यास हाहि उयाय नव्हे. कारण धैर्याच्या पोटांत भय लपलेलें असतें आणि संन्यासाच्या मागल्या बाजूस लोभ उभा असतो. किंबहुना आपल्या सद्‌गुण कल्पना आपल्या दुर्गुणांतून आणि सदोष समाजपद्धतींतून उद्भवल्या असल्यानें सापेक्ष आहेत. त्यांना स्वयंभू किंमत नाहीं.

गरज हा जीविताचा आधार आहे. गरजा दाबून अथवा मारून चालणार नाही. त्या शुद्ध केल्या पाहिजेत. त्यांचें नीट आकलन करून घेतलें पाहिजे. गरजांचें स्वरूप जाणून भावून मोकळें झालें पाहिजे.

तृष्णा मुख्यत: तीन विषयांची असते. इन्द्रियभोगांची, ऐश्वर्याची व अमरत्वाची. कीर्तीची लालसा व सत्तालोभ हीं अमरत्वाच्या तृष्णेचीच अन्यरूपें आहेत, पहिल्या प्रकारची तृष्णा कांहीं केल्या कायमची तृप्त होत नाहीं. याचें कारण बाह्य इन्द्रियविषय हीं साधनें आहेत. अखेर खरी किंमत उपभोगाला नसून मनुष्यमात्राला आहे. अमरत्वाच्या तृष्णेचा मुळीं विषयच मृगजळासारखा आहे; कारण आपल्या व्यक्तित्वाला केवळ स्वतंत्र अस्तित्व नाहीं. सृष्टीच्या प्रक्रियेचाच तो एक अंश आहे आणि ही प्रक्रिया सतत बदलणारी असल्यामुळें हें व्यक्तित्वहि कायम टिकूं शकत नाहीं.

## सुखाचा शोध

दु:खमुक्त व्हावयाचें असेल तर प्रामाणिकपणें आत्मपरीक्षण केलें पाहिजे; आपण कोण आहों आणि आपणास खरोखर काय हवें याचा शोध घेतला पाहिजे. त्यासाठीं तृष्णेचें स्वरूप समजून घेऊन आपल्या खऱ्या गरजा कोणत्या हें ओळखलें पाहिजे. तृष्णेमागचा अहंकार हा एक भ्रम आहे. तो झटकून देऊन आपल्या आत्मरूपाचा प्रत्यय घेतला पाहिजे. आपण खरोखर कसे आहों आणि आपल्या युक्त व नैसर्गिक गरजा कोणत्या आहेत हें उमजल्यास तृष्णा नाहींशी होईल, लोभ संपेल, भय उरणार नाहीं, त्यामधून उत्पन्न झालेले झगडे मिटतील, विरोध मावळतील, मनुष्यामनुष्यांतील खरीं जिवंत नातीं दिसूं लागतील, अंतरंगांत प्रेमाचा उदय होईल आणि आपल्या प्रामाणिक प्रेरणानुसार पूर्ण, संपन्न व मस्त जीवन कसें जगावें याचाहि उमज पडेल. द्वेष नसणें म्हणजे प्रेम नव्हे. भोगलालसा म्हणजेहि प्रेम नव्हे. अहंभावजन्य चळवळी थांबल्या, आत्मज्ञान झालें असणें म्हणजेच एकत्र असणें हें समजलें म्हणजे निसर्गत:च जी भावना उत्पन्न होते तेंच प्रेम होय.

सत्यज्ञान हाच दु:खावरील साक्षात् उपाय आहे. सुख, प्रेम, आशा याचा शोध आपल्याबाहेर करूं गेलें कीं नेमकी निराशा, विरोध व दु:ख पदरीं येतें, याच्या उलट आत्मज्ञानांत सर्व प्रकारचें समाधान लाभतें. खरा उत्साह प्रज्ञा व प्रेम यामधून उद्भवत असतो. कृत्रिम उद्दीपनानें उपस्थित केलेल्या उत्साहाहून तो निराळा असतो. खरा आनंद आत्मज्ञानांत आहे. एकाद्या ठराविक ध्येयामागे लागल्यानें मन गढूळ होतें; पण आपण जसे आहों तसे स्वतःस समजून गेलों म्हणजे [illegible] पराकोटीची प्रसन्नता प्राप्त होते. वैभव, बहुमान आणि शारीरिक संपदा यांच्या लाभानें मिळणारा आनंद त्या प्रसन्न आनंदाशीं तुलताच येणार नाहीं. कारण त्या आनंदांत ईप्सिताबद्दलची उत्कंठा नाहीं, भयहि नाहीं; कारण त्यांत जय नाहीं, पराजयहि नाहीं। खरी शांति व अमरताहि आत्मज्ञानांतच आहे. आत्मज्ञानी सदैव अमर्याद वर्तमानकाळांतच वावरत असतो. अमरत्व पुढें लाभायचें नसून आज येथें लाभलेलेंच आहे.

मी निश्चित आणि व्यावहारिक असा कोणताहि सिद्धान्त सांगितला नाहीं असें तुम्ही म्हणाल, पण






निश्चित सिद्धान्त व रेखीव तत्त्वज्ञान माझ्याजवळ नाहींच. जीवनांत क्रांति घडवून आणण्यासाठीं आचाराचें नेमकें कोष्टक रचण्यावर माझा विश्वासच नाहीं.

शिवाय मी काय म्हणतों त्याचा विचार करून याप्रमाणें आचरण केल्यावाचून माझें म्हणणें निश्चित आहे कीं नाहीं, व्यावहारिक आहे कीं नाहीं याचा तुम्हांला प्रत्यय येणार नाहीं. आपले निर्णय कृतींत आणण्यांतच सारी कुचराई होत आहे. याला धैर्य हवें आहे असें नव्हे तर निव्वळ सत्यान्वेषण आणि सत्यज्ञान हवें आहे!

मी माझ्या प्रियतम मानलेल्या आत्मरूपाशी एक झालों आहे. याविषयीं मला यत्किंचितहि शंका नाहीं म्हणूनच त्याचा उच्चार करीत आहे. मी मुक्त झालों आहें हें खरें आहे पण त्यांत अद्भुत असें कांहींच नाहीं.

---



# विकासाचा प्रकाश

* चांगले रस्ते व गटारें
* स्वच्छ गांव व अधिक आरोग्यपूर्णता
* सुधारलेली शेती व जास्त पीक
* निरक्षरता व अस्पृश्यता यांच्याविरूद्ध निग्रहाची मोहीम
* पाण्याचे नळ व शेणखताचें गॅसप्लँट यासारख्या सोयी

मध्यप्रदेशांतील रायगड येथील समाज विकास कार्याच्या गटांमधील पटेलपाली या खेड्यानें प्रयत्नपूर्वक साध्य केलेल्या या व अशा सर्व सोयी म्हणजे त्या गांवाच्या नवजीवनाची नांदीच होय. यासाठीं पुढाकार व सारे प्रयत्न तेथील गांवकऱ्यांनींच केले.

पटेलपाली गांवानें जे साध्य केले ते तुम्हींही करूं शकाल. आदर्श खेडें म्हणजे तुमचें सुखी जीवन आणि तुमच्या राष्ट्राची द्रुत प्रगति होय.

## योजनेस सहाय्य म्हणजे स्वतःस सहाय्य

DA-59/255.










अनुक्रमणिका






